# संपादकीय

प्रस्तुत संहात प्रथम २७ पत्रें जीं दिलीं आहेत तीं पेशवे मंडळींनीं पुरंदरे मंडळींस लिहिलीं असल्यानें **पुरंदरे दप्तराची** पुरवणी म्हणून यथार्थ शोभते. सर्व पत्रें अस्सल व महत्त्वाचीं आहेत. हीं पत्रें मिळविल्याबद्दल श्री. ब. मो. पुरंदरे यांना धन्यवाद दिले पाहिजेत. बाकीच्या प्रकरणांपैकीं श्री. मा. वि. गुजर यांनीं संपादिलेलें **थोरल्या** माधवरावांचें पत्र अत्यंत मननीय व तत्कालीन परिस्थितीवर स्वच्छ प्रकाश पाडणारें आहे यांत संशय नाहीं. शिंदेहोळकरांना जी ' समज ' दिली आहे ती योग्य नाहीं. असें कोण म्हणेल ? अशीं पत्रें आतापावेतों फारच थोडीं उपलब्ध झालीं आहेत. श्री. ग. ह. खरे यांनीं केलेली पुरंदरे दप्तर भाग १ ला यांतील तारखांची दुरुस्ती त्यांच्या हिंगणेसंग्रहाच्या अभ्यासाचें फल असून तीवरून हिंगणे दप्तर कसें विश्वसनीय व महत्त्वाचें आहे हें समजून येतें. शेवटचा श्री. वा. सी. बेंद्रे यांचा इंग्रजी निबंध फॅक्टरी आणि कंपनी रेकार्ड यांची स्पष्ट माहिती करून देणारा असून इतिहास-संशोधकास बहुमोल वाटेल.

**चिटणीस**
भा. इ. सं. मंडळ, पुणें

Printed by Mr. Vitthal Hari Barve at the Aryabhushan Press, House No. 915/1 Shivaji-Nagar, Poona City and published by Sardar Gangadharrao Narayanrao Mujumdar, C. I. E., at 313A Sadashiv Peth, Poona 2, India.

# अनुक्रमणिका

## सौ. बयाबाई आपटे



[ श्रीमंत ल. चिं. थत्ते ( पेशवे ) व श्री. य. रा. गुप्ते यांच्या कृपेनें ]

श्रीमंत दुसरे बाजीराव साहेब पेशवे यांच्या कन्या बयाबाईसाो आपटे सौभाग्यवती असतां त्यांनीं हें मूळ छायाचित्र श्रीमंत लक्ष्मणराव चिमणाजी थत्ते यांस दिलें होतें. तें फिक्कें पडलें तें श्री. य. रा. गुप्ते यांनीं पेन्सिलीनें दृढ केलें; त्यावरून ब्लॉक केला आहे.

# ऐतिहासिक संकीर्ण साहित्य

## खंड ७ वा

## पूर्व पेशवाईंतील सत्तावीस महत्त्वाचीं पत्रें.

( श्री. बलवन्त मोरेश्वर पुरंदरे, पुणें. )

*पुढील सर्व पत्रें मला, माझे मित्र श्री. रा. **सदाशिव नागेश उर्फ राजाभाऊ सरंजामे ( सहस्रबुद्धे )** यांचेकडून मिळालीं. हीं सरंजामे यांच्या घरीं कशीं आलीं हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. सर्व पत्रें थोरले बाजीराव, चिमाजी आप्पा, नानासाहेब व राघोबादादा या पेशवे मण्डळींनी अम्बाजीपन्त, महादोबा उर्फ बाबा, धोंडोबा उर्फ आप्पा व नाना ह्या पुरन्दरे मंडळींस लिहिलेलीं दिसतात. फक्त क्र. ६ चें पत्र नानासाहेब पेशव्यांस लिहिलेलें आहे. कालदृष्ट्या हीं सामान्यतः इ. स. १७३० ते १७६१ च्या दरम्यानचीं २६ पत्रें असून फक्त क्रमांक २७ चें पत्र मात्र १७६१ सालानन्तरचें असावें. यांपैकीं कांहीं पूर्णतया व कांहीं अंशतः खाशांच्या हस्ताक्षरांतील आहेत. हस्ताक्षरांचा निश्चय करतांना श्री. कृ. वा. पुरन्दरे यांनी केलेल्या मदतीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. श्री. सरंजामे यांचे आभार तर मानावे तितके थोडेच आहेत.

ले. १ हें पत्र चिमाजीआप्पानें अंबाजीपंत पुरंदऱ्यास लिहिलें आहे. यामध्यें निजाम सोनगड व कुकडमुंढ्याचे रोखावर आहे, असें म्हटलें आहे आणि सन १७२७ डिसें. २५ व सन १७२८ जाने. १४ या दिवशीं थोरल्या बाजीरावचे मुक्काम अनुक्रमें कुकडमुंढे व सोनगड या ठिकाणीं असल्यामुळें [ बाळाजी बाजीराव रोज० भाग २ पृ. २२९] असें वाटतें कीं, हें पत्र पालखेडच्या लढाईच्या पूर्वीचें असावें, परंतु " गुजरातेस जाण्यास कोणी पाय घेत नाहीं आणि पिलाजी जाधवराऊ आनंदराऊ पवार येकत्र होऊन गंगा उतरून गेले " या उल्लेखावरून हें पत्र कदाचित् ढभईच्या लढाईच्या पूर्वीचें आणि जानेवारी अगोदरचें असेल असें वाटतें. आनंदराव पवार १७३१ च्या जानेवारी अखेरीस पेशव्यांची बाजू सोडून दाभाड्याकडे गेल्याचें ठाऊक असल्यामुळें ( पेद २२ । ५८ ) वरील विधानास पुष्टी मिळते. अंबाजीपंतास चिमाजीनें शाहूजवळ कांहीं बोलणें करण्यास सांगितलें आहे. तेव्हां पत्राच्या वेळीं अंबाजी

*२३ वें संमेलन. श. १८६८ (१९४६).

व शाहू हे येकत्र असून चिमाजी दूर आहे. पत्र चिमाजीआप्पांचे हस्ताक्षरांतील आहे.

ले. १ अस्सल } श्री { श. १६५० किंवा १६५२-५३ इ. १७२८ किंवा १७३१

पुा राजश्री **अंबाजीपंत** स्वामी गोसावी यासि

विनंति उपरि नवाब **निजामन्मुल्क सोनगडच्या** व **कुकडमुंढियाच्या** दोही रोखावर आहे अद्याप येकीकडेच गेला येसे नाही **मखबुलअलम** कोकणात उतरला नाही **मल्हारजी होलकर राणोजी सिंदे** याजकडील सांप्रत वर्तमान आले नाही रा **पिलाजी जाधवराऊ आनंदराऊ पवार** येकत्र होऊन **गंगा** उतरोन गेले पाच सा हजार जमा जाले आहेत राजश्री **कृष्णाजी पवार** याची व रा **नार प्रभूची** गाठ घालून रवा [ ना * ] केले **कृष्णाजी पवार** स्वार होऊन गेले **नारप्रभू** उदईक प्रतिपदेस जातील **नार परभूचे** समाधान बहुता प्रकारे केले असे **बरवाजी ताकपीर** समागमे दि [ ल* ] ह्याने **दाभाड्याचा** शह **भावसिंग** बरोबर दि [ ल* ] ह्याने निजामाचा शह याकरिता **नारप्रभूच्या** आमचे विचारे दोघासही राहावावेसे जाले त्यावरून राहविले असेत त्याहीमध्ये जर मातबर फौज जथत असती तर दोघेही समागमे देतो यातही फौज जथेना या करिता ज्यामुले कजिया लागावा ते ठेऊन घेतले **कृष्णाजी पवार** पाच सातसे होतील **नारप्रभूही** म्हणतात जे पाचसे राऊत आपण ठेविले आहेत कदाचित् असले तर तीनसे असतील येकूण हजार घोडे होईल येवढियानसी निभाव वाटेचा होऊन मुलखात गेल्यावर अमल बसतो येसे नाही सेनापति तो याजवर फौज परिछिन रवाना करणार **पिलाजीही** परिछिनवादे कजिया करणार याकरिता लक्षा प्रकारे राजश्री **नारबावास** जे रीतीने सागणे ते रीतीने सागून **नारप्रभूस** व **कृष्णाजी पवारास** तूर्त मनारोखा येई ते करावे तरच त्याची शरम राहील आम्ही मातबर फौज जथून घ्यावी तर आम्हापासी येक रुपया यावयास नाही आणि गुजरातेस जाण्यास कोणी पाय घेत नाही याकरिता त्याचे राहाणे तूर्त होये तो विचार करावा **नारपरभूचे** समाधान रक्षून इमान प्रमाण घेऊन रवाना केला असे थोडी बहुत त्याची बेगमीही केली असे हे विनंति

---

पुढील तीन पत्रें वसई-मोहिमेपैकीं धारावीच्या वेढ्याविषयींचीं आहेत. धारावी मार्च ६ सन १७३९ पूर्वीं फत्ते झाली. तत्पूर्वीचीं हीं पत्रें आहेत. हीं चिमाजी

१ ) नारोराम मंत्री—साताऱ्यास आहे
२ ) नारो विठ्ठल प्रभु

अप्पानें बाचा पुरंदऱ्यास लिहिलीं आहेत. पहिल्या व दुसऱ्या पत्रांत बाचानें केलेल्या युद्धोपयोगी साहित्याच्या मागणीचा उल्लेख असून तिसऱ्या पत्रांत प्रत्यक्ष धारावीच्या वेढ्यांत मदतीला असलेल्या साहित्याचा तपशील दिलेला आहे. पत्रांचे शेवटचें निराळें अक्षर चिमाजीचें. पूरक पत्रें पे. द. १६ ले १३५, १४१ व १४४.

ले. २ अस्सल श्री श. १६६० माघ–फाल्गुन
इ. १७३९ फेब्रु.

चिरंजीव राजश्री **माहादोबा** यांसि आशीर्वाद उपरी तुम्ही फौजेनसी **गाईमुखावर** जाऊन बसले आहा व रा **खंडोजी माणकर** व **रामाजी महादेव** पाईच्या जमावानसी बोढ्याजवल अर्धे गोलीच्या टप्यावर जाऊन बसले आहेत म्हणौन खासबारदार आला त्याणें सांगितले येैशास गनिमाचे जोरे याचा अर्थ तुम्हास कललाच असेल व जागाही तुम्ही पाहिला या उपरी विचार काय साहित्य काय पाहिजे तोफा तयार केल्या होत्या त्या ठाणेयाहून आणवाव्या किंवा काय तें लेहून पाठवणे त्यासारिख्या आणल्या जातील आजीचा मुकाम तुमचा तेथे अनयासेंच जाहाला आजीच्या रात्रींत विचार काय होईल तो लेहून पाठवणें तदनुसार तुम्हास उदैक आज्ञा करणे ते केली जाईल तुम्ही मेहनत व खटपट करावयास चुकाल यैसे नाही **धारावीचे** यश तुम्हास व **खंडोजी माणकर** व **रामाजी माहादेव** यास श्रीने दिल्हे तरी या यशास दुसरा जोडा आहे येसे नाही [ नि * ] रात्री बहूत खबरदार राहणे तुम्हास हे थोर यश आलियाने आमची आबरू राहिलीसी होईल बरे देवाची इछा जैसी असेल तैसी होईल तुमचे पदरी **तात्याचेंही** पुण्य आहे तेणेकरून अुतमच होईल हे आसीर्वाद

---

ले. ३ असल श्री श. १६६० माघ – फाल्गुन
इ. १७३९ फेब्रु.

चिरंजीव राजश्री **माहादोबा** यांसि आसीर्वाद उपरि तुम्ही चिठी पाठविली ते पावली लोकाचे जेवण जाहालें पाहिजे याजकरितां पाण्यावर येक जागा राहून मोर्चे राखणे व पाणी जवल नाहीं ह्या दोन गोष्टी कैशा पुरवतील वास्तव रात्रीचे येक जागा राहातो प्रातःकाली आज्ञा होईल तैसे करून म्हणौन लिहिले ते कलले यैसियास गनीम बाहेर निघोन जुझ देई न देई तो अर्थ तुमच्या दृष्टीस पडणे तो पडलाच असेल जागियाचाहि अर्थ तुमच्या चितात येणें तो आलाच असेल त्यास मोर्चे लावावे न ला [वा *] वे जागा हस्तगत होईल न व्हे तुमच्या विचारे कैसे आहे तोफा जोडिल्याने काम होत असेल तर तोफा आणऊन लेहून पाठवणें दाण्या वैरणीचा अर्थ तर आजीचा दिवस नवा आहे क्षणामला या माते खोलीचे

घरी आहे व दास्ताने आहेत घोडियास दीड पायली साळी व सेर तादूळ माणसास या प्रो मिलेसारिखे आहे तेथील विचार तुमच्या दृष्टीस पडला असेल व सर्वांच्या विचार कर्तव्या अर्थ असेल तद्नरूप लेहून पाठवाल त्याप्रो साहित्य केले जाईल [ नि * ] बाहेर गनिमाने निघोन तुमच्या गळा पडवणार नाही येसे तो आजच्या विचारावरून दिसते श्रमाखेरीज तो कोणीयेक पदार्थ होईलसे नाही जर तोफा जोडून आठदहा दिवस मेहनत केलियाने कार्य होईल येसे ध्यानांत आले असेल तो अर्थ लिहिणे पोटाविसी लस्करच्या लोकास व पायच्या लोकास सर्वास अडचण पडू देणार नाही पधरा दिवस पावेतो तादूल भात मिलेल लस्करच्या लोकानी यारया वर व चाकरा-पासून न्यावे लागेल पायच्या लोकास कांहीं वेठ्यावर कांहीं ज्याचे त्यानी न्यावे लागेल गनीम पाच च्यार हजार असेलसे दिसत नाही फार तर तीन हजार पावेतो असेल तुम्ही पुर्ता विचार कार्य व्हावयाचा चितान आणून लिहिणे तुमचा विचार लिहिला आलियावर येथून उतर पाठऊ त्याप्रमाणें विचार करणे हे आसीर्वाद

---

ले. ४ असल } श्री {श १६६० माघ फाल्गुन
{इ. १७३९ फेब्रुवारी

आसीर्वाद उपरी

**धारावीचे** मोर्चेयास साडे तीन हजार माणोस नेमिले आहे त्यास येका दोघाचे गळा पडोन धाशत पाडिलियांस नेहमी तीन हजार माणोस राहीलच

१

**मानाजी आंग्रे** यांणी पाचसे माणोस रवाना केले ते येका दोरा (रो) जा यईल पाचसे माणसाचे जागा च्यारसे माणोस नेहमी चाकरीस राहील

१

येकून चौतीससे माणोस हशमांचे या खेरीज लस्करचे माणोस

पाच सातसे स्वार घोडीयावरील तुम्हा जवल जमा आहेतच

१

बांडियांकडील घोडीया खेरीज तीन च्यारसे पाये उतारा आहेत

१

यों हजार अकरासे होतील हशमी व लस्कर मिळोन साडे च्यार हजार होतील बाहिऱ्यांचा विचार तर

नौका तीन तयार आहेत
गोलदाज म्हणावे तैसे
रा। दुर्जनसिंग याजकडे
आपणा जवल आहेत
१

दारुगोला विपूल आहे
जो पाहिजे तो सिध आहे
१

हशमी लोकास पोटास
शेर पाहिजे तर इकडे
तांदूल पाहिजेत ते केले
असेत तयार आ [ हे ]-
त त्यासही पोटास मिळेल
येक महि [ना] बाकी दहा-
पाच रोज जाजती पोटाचे
संकट पडेल यैसे नाही
१

पोटाची बेगमी म्हणजेल तरी
घोडियास पाईली दीड साली
येथून अगर ठाणियाहून
आणवीन म्हटल्यास येक
मासाची बेगमी आहे आधी
रोजमरा दिल्यानी लोकास
गला मिळेल जरी न मिळे
तर कोठी पैकी देईन म्हटले
तर आहे
१

साहित्याविशी कमी पडो
देऊन हे होणे नाही सिध
आहेच नाही ते आणून
हाजीर करून
१

तेलतूप किरकोल सामान
पाहिजे तेही मिळेल
१

लोक सामान साहित्य या प्रो आहे तुमच्या वि [ चारे ] महिना पंधरा रोज श्रम-साहास केल्यानी कार्यभाग सिधी होत असेल नेट धरिल्यास काम होने न होने ते तुम्हास व चौघास कललेच असेल साहित्याचा व सामानाचा दोनी विचार तुम्हास कळले असावे याजकरि [ ता ] विस्तारे करून अुलगडून लिहिलेच आहे यांमध्ये तुम्हास अनकूल पडेल दम साठेल तर साठणे राहाणे जरी दम न साठे राहिल्यानी कार्य होत नाही वृथा राहारे यैसाच विचार तुमच्या दृष्टीस पडेल तर येणे म्हणोन तुम्हांस लिहिलेच आहे दुसरे पत्राची वाट न पाहाता अुठोन येणे मुख्य गोष्टी इकडील साहि-त्याचा विचार तुम्हास कळावा म्हणोन लिहिले असे तेथील विचारानरूप तुमचे विचारे विचार दिसेल तद्नरूप करणे [ नि * ] हे आसीर्वाद

---

बाजीराव बल्लाळाचें हें बाचा पुरंदऱ्यास पत्र आहे, वसईच्या विजयाबद्दल बाबाचें अभिनंदन करून दरबारांतील पुढें होणाऱ्या वाटाघाटी बोलण्याविषयीं कांहीं सूचना

तो देत आहे. पत्र–अखेर बाजीरावाचे हस्ताक्षरांतील आहे. पूरकपत्रें–ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र ले. ५५; पे. द. १५ ले. ७४

ले. ५ असल } श्री { श. १६६१ चैत्र वद्य १०
इ. १७३९ अेप्रील २१

चिरंजीव राजश्री **महादोबा** यासी **बाजीराव बल्लाळ** आशीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २३ मोहरम जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष तुम्ही दोन पत्रे पाठविली ते पावली लिहिला अर्थ सविस्तर कलला ईश्वरें येश मोठेंसे दिल्हे येथील कितेक वृत चिरंजीव राजश्री **आपा** यांस लिहिले आहे त्याजवरून कलेल [ नि * ] तुम्हीही येशास सामील जालेस अता दरबारास जाल तेथे कैसे बोलाल बोलणें होईल ते सविस्तर लेहून पाठवणे कोठे सख्ती उछखलता सर्वथा न करणे लोभ असो दीजे तेवढे **पाटणकराचे** काम व **रेठरे** ( कर ) याचे करणे हा आसीर्वाद

---

या पत्राच्या मायन्यांत हें पत्र बाजीराव बल्लाळानें लिहिल्याचें सांगितलें असलें तरी संपूर्ण पत्र वस्तुतः चिमाजी आप्पानें लिहिलेलें आहे. हें पत्र समजण्यास पुरं. दप्तर भाग १ मधील लेखांक १३८, १३९, हे अतिशय उपयोगी पडतील. त्या पत्रांतील व प्रस्तुत पत्रांतील मजकुरावरून हीं पत्रें, बाजीराव व चिमाजी आप्पा यांनीं निजामाचा मुलगा नासिरजंग या विरूद्ध केलेल्या गोदावरीच्या स्वारीचीं व इ. स. १७४० च्या आरंभीचीं ठरतात. पुरन्दरे दप्तरमधील लेखांकांत फेब्रुवारी ७ रोजीं झालेल्या हालचालींची माहिती दिली असून प्रस्तुत पत्रांत ८ फेब्रूवारीच्या हालचालींची व पुढील बेतांची माहिती दिली आहे. पुरं. दप्त. १–१३९ च्या लेखांत " राजश्री स्वामी सान्या फौजा कुमकेस पाठवितील तर सा सुभे दक्षण मोकली व्हावी येसा समय आहे " असें अेक वाक्य आहे. या पत्रांत " महाराजांनी तमाम फौजास आज्ञा करून पुस्तवानी केली तर मोंगलाचे निर्मूलन करावे अैसे आहे" असें विधान केलें आहे. बाजीरावास या लढाईतून कोणत्या प्रकारची फलनिष्पत्ती करतां येईल असें वाटत होतें हें स्पष्ट दिसतें.

या स्वारीची माहिती देणारीं आणखी अेकदोन पत्रें व नोन्दी आहेत.

तसेंच हदीकतुल आलम मध्येंही या स्वारीची नासिरजंगाचे बाजूची हकीकत आहे. परंतु प्रस्तुत पत्र व पुरं. दप्तरांतील उपर्युक्त पत्रें यांत आलेला मजकूर दुसरीकडे कोठेंच नाहीं या दृष्टीनें हें पत्र महत्त्वाचें ठरतें.

ले. ६ असल } श्री { शक १६६१ माघ व. ८
{ इ. १७४० फेब्रुवारी ९

चिरंजीव राजश्री **नाना** यास **बाजीराऊ बलाल** आसीर्वाद उपर येथील कुशल ता। छ २१ जिल्काद शनवार मुकाम मौजे **तादुलवाडी प्रा। सेदूरवादे** यथास्थित असे विशेष काल शुक्रवारीं **नासरजंग** याचे फौजेसी थडक जाली अर्धी हुजरातेची फौज चिरजीव **रा। आपा**जवल होती ते फौज चालून जाऊन मोगलाचे ढिगास थडकली मोगलाच्या आरब्याचा मार सोसून चालीनेच जाऊन सेदोनसे लोकाचे हात लागले तोफा सोडून मोगल माघारे सरले होते परंतु पहिल्या माराने सेदानसे घोडे सेपंनास माणूस जाया जाले व त्याकडीलही सरदार फिरोन कुमकेस येऊन पोहचले त्यामुले काल मोगलाचा आव राहिला तैसेच हरोलीस **राणबा मल्हारबा** यानीही उतम प्रकारे हत्यार लावले उजवे बाजूस **फिरगोजी पवारावर रा। पिलाजी जाधवराव व सभाजी सिंदे** व आणीक पथके होता ते उठली **फिरगोजीस** मोडून ढिगात घातला निराली निराली जुझे जाली आज सार्‍या फौजा येकावर येक नजर राखून येकदाच सार्‍यानी उठावे येसा करार करतो आणि मानमार्ग पाहून गनिमावर सलाबत बसवितो जर ये समई माहाराजानी तमाम फौजास आज्ञा करून पुस्तवानी केली तर मोगलाचे निर्मूल करावे येसे आहे पुस्तवानी न करीत तर जरबेत आणून गनिमावर सलाबत बसऊन सला करीतच आहो माहाराजाचा प्रताप समर्थ आहे तेणेकरून सर्वप्रसंग उतम प्रकारेच सेवटास लागेल हे आसिर्वाद पाच सात घोडी मोगलाच्या ढिगातून पाडाव करून आणली हे आसीर्वाद

---

ह्या पत्रांत देवरी ( सागर जिल्हा म. हिं. ) व गौर झांबरे ( दमोह जिल्हा म. प्रां. ) हीं दोन ठिकाणें जिंकल्याचे उल्लेख आहेत. व त्या जिंकलेल्या छोट्या राज्याचें उत्पन्न २ लाख रुपये असल्याचाही उल्लेख आहे. बाळाजी बा. रोज. भाग २ पृष्ठ २३९ व रा. खंड २ पृष्ठ ९१ वर नानासाहेबांनी देवरी दि. ८ मार्च १७४१ ला जिंकल्याची नोंद आहे. या दोन्ही ठिकाणीं फक्त देवरी फत्ते केल्याचें नमूद आहे. परंतु प्रस्तुत पत्रांत गौरझांबर हेंहि ठिकाण फत्ते केल्याचा अधीक उल्लेख आहे. पत्र नानासाहेबांनी धोंडोबा उर्फ आप्पा पुरंदरे यांस लिहिलें आहे. शेवटचें निराळें अक्षर नानासाहेबांचें.

ले. ७ असल } श्री { श. १६६३ चैत्र शु. १४
{ इ. १७४१ मार्च १२

पौ छ ४ सफर

चिरंजीव राजमान्य राजश्री **धोंडोबा** यासी प्रती **बालाजी बाजीराऊ** प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र

पाठविले ते पावले लिहिले वर्तमान अवगत होऊन संतोष ला [ भ * ] जाहाला येथील वर्तमान राजश्री **दादोबास** लिहिले आहे त्यावरून कलो येईल ।। छ ५ मोहरम + **नर्मदा** अुतरतीरास आलियानंतर **गौरझावरचा** राजा **दुर्गसिंगाची** जागा लडाख **देवरी** होती तेथे मोर्चे लाविले येक महिनियानंतर सुरुंग आतील किल्ल्यास लागू जाहाले सुरुंग लागू होताच दहशत खाऊन कौल घेतला इजतीनसी बाहेर काढला जागे **देवरी** व **गौरझावर** दोनीही घेतले राज्य दोहो लाखाचे आहे आता त्याची जड राहिली नाही परतु येक महिना गुता जाहला तुम्हास कलावे यास्तव लिहिले असे बहूत काय लिहिणे छ ५ मोहरम हे आसीर्वाद

---

नानासाहेबांचा मुक्काम प्रयागेस आहे.--( बा. बा. रो. भा. २ पृ. २४२ ) सैन्यास घडलेल्या या तीर्थयात्रेचें वर्णन थोडक्यांत त्यानें आप्पा पुरंदऱ्यांस निवेदिलें आहे. शेवटीं निराळें अक्षर नानासाहेबाचें.

ले. ८ असल श्री { श. १६६४ माघ व. ४ इ. १७४३ फेब्रु. १ }

चिरंजीव राजश्री **धोंडोबा** यासि प्रती **बालाजी बाजीराव** प्रधान आसीर्वाद अुपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष येथील वर्तमान तरी **जगमन-पुरा** पासी **ग्वालेर** प्रांतातून आठा मजलीनी पोहचलो तेथून दाहा कोसाच्या मजली पंधरा करून **प्रयागास** माघ शुध चतुर्दसीस दाखल जाहालो **अलीरखान** भागीरथी पलिकडे अुतरतीरी फौजेसह वर्तमान राहिला त्याचे समोर आम्ही **गंगेचे** दक्षण तीरी राहिलो पहिलाही श्नेह होता च साप्रतही विशेष श्नेह दाखऊन नावा दिल्हा आणी किलेदारास आज्ञा दिल्ही की जे लोक यात्रेस किलियाखाली व शहरात येतील ते येऊ न देणे त्याजवर सर्व सरदार लोक यथाविधीने पलीकडे जाऊन किलिया खाली जेथे **सरस्वती** निघाली म्हणतात तेथे येऊन क्षौरे श्राध करून आले आम्ही स्नान मात्र **त्रिवेणीत** पलीकडे जाऊन केले माघारे त्वरेने आलो या प्रकारे लस्करास यात्रा घडणे कठीण होते परंतु श्रीकृपेने घडलीयाअुपर कासीस साहा दिवसी जाऊ ऐसे दिसते वरचेवर वर्तमान लिहीत जाणे [ नि * ] छ १६ जिल्हेज हे आसीर्वाद

---

सदाशिव चिमणाची ऊर्फ भाऊसाहेब–पेशवे यांचें हें धोंडोबा ऊर्फ अप्पा पुरंदरे यांस पत्र आहे. बाबूजी नाईक बारामतीकर यानें दमाजी गायकवाडाचा सोनगड-मुक्कामी जो पराभव केला त्याचाच उल्लेख गायकवाडाचे येश घेतलें ह्या वाक्यानें दर्शित असावा. पत्र अपूर्ण आहे.

ले. ९ असल } श्री { श. १६६५ ? इ. १७४३ ?

चिरंजीव राजश्री **धोंडोबा** यासी **सदासीव चिमणाजी** आसीर्वाद अपुरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष विंशेष राजश्री **बाबूजी नाईक** यानी **गायेकवाडाचे** येश घेऊन आम्हास पत्र पाठविले त्याची नकल पाठविली आहे त्याजवरून कलेल मुख्य गोष्ट नाईकानी इतका साहास केला तथापी **राजश्री स्वामीचा** आश्रये नाहीं व **दाभाडियाचा**ही आश्रये नाहीं उगेच पैका खर्च करून धटाईने कर्म अविलंबिले ते कैसे म्हणाल तर राजश्री स्वामीनी नाईक मशार निलेस मसाले व हुजरे व पत्रे (पुढील भाग फाटून गहाळ)

---

या पत्रांत नानासोने राणी सगुणाबाई ( शाहूची धाकटी राणी ) हिची मनधरणी करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत सगुणाबाईनें त्याच्यासाठी निंबगांव हिवरे प्रकरणामुळें निर्माण झालेल्या सकवारबाईच्या कज्यामध्ये आणि कर्जामुळे अुत्पन्न झालेल्या शाहूच्या नाराजीच्या बाबतींत प्रयत्न करून त्याचा निकाल बाळाजी बाजीरावास अनुकूल कसा करून दिला आणि मानाजीच्या बाबतींत त्यानें काय करावें आणि इतर सर्व बाबतींत सगुणाबाईनें त्यास मदत कां करावीं या विषयीच्चा खुलासा या पत्रांत आहे. मानाजी आंग्रे प्रकरणी पेशव्यांच्या तकरारी काय होत्या हेंही यांत नमूद केलें आहे. हें पत्र समजण्यासाठीं ऐ. प. व्य. ले. ४१, ८०, ६५ व 'ऐ. प. यादी वगैरे' मधील क्र. ३५ हीं पत्रें पहावी. प्रस्तुत पत्र संपूर्णपणें नानासाहेबांचें हस्ताक्षरांतील आहे.

ले. १० असल } श्री { श. १६६९ चैत्र व. २ नंतर इ. १७४७ अेप्रील १५ नंतर

आसीर्वाद अुपरी यदा आमचा रुसवा थोरले वाडियातील कांजेयामुले बहुत वाढला ते समई बाईनी सर्व प्रकारे आमचा अभिमान धरून बहुता प्रकारे राजश्रीस विनंति करून आमचे समाधान केले राजश्रीचा व आमचा लौकीक दिली पावेतो जाहाला तो बाईनी मनसब्यावर दुरंदेसीनें नजर चालअून सर्व प्रकारे संभालिला हे विषम थोरले वाडियात मनात फार होते **निमगाव हिवरे** याजवरूनच अतिराग आला सर्व शफता क्रिाय करार मदार मोठे मोठे कवडीचे कामासाठी सोडून दिल्हे असियास अशा गोष्टीवरून अतिराग आणावा हे सहसा उचीत नव्हे महतर अतर येखादे लेकूरपणे वेडेपणे पडले तर खावंदानी रुपाकरून शासन (न) करता क्षमा करावी शासनही करणे तर लेकराप्रा करावे आम्हास **बाईखेरीज** राज्यात आधार नाहीं आम्हास मोडावे सर्वांचे मानस ज्याचा अभिमान धरावा त्याचा सेवट करावा त्यास आमचा अभिमान सर्व प्रकारे

धरावा सर्वप्रकारे उपयोगी असता लहान मनुष्य गावखेडेपाटलिकी दाखवून पेच पाडू इछितात त्यासच फजीत करावे राजश्रीपासी वरचेवर आम्हा कडील अर्ज पडेल तो सख्त नम्र जसा प्रसंग पडेल तसा करावा राजश्रीस कर्जाचे मजकुराविसी समजावावे विचारे निभावे ऐसी आज्ञा करावी येणे प्रा बाईसाहेबानी करावे उचीत असे **मानाजीचा** अभिमान आमचा गैर अभिमान योचे कारण काये आम्ही काये दुरील तो काये भरवसियाचा असो बाईसाहेबाचे मर्जीहून आम्हास काये अधीक आहे आमची देशमुखी चालवावी रुपये मागील देवावे पुढे आम्हासी हिमायेतीने न वर्ते ऐसे करावे हे आसीर्वाद

---

नानासाहेब हें गुप्त पत्र नाना पुरंदऱ्यास लिहीत आहे. 'येकांती वाचणे' 'पत्र कोणासही न दाखवणे' पत्रोत्तर 'पोरग्याजवल देऊन आम्हाजवल पावे ऐसे करणे' ह्या त्याच्या पुरंदऱ्यास लिहिलेल्या सूचनाच पत्राचें महत्व दर्शवीत आहेत. "राज्याचा ( छ रामराजा ) लटका लगाम राही, दार्याबाई जुना सरंजाम सरलस्करचा घेऊन राही ...... राजाही थोडा बहूत रजावंद राही, आईसाहेब मान्य पुरुष राहात ... असे करावे. नानासाहेबाचें घरच्या भानगडी बाबतचें धोरण या पत्रांत बरेचसें दिसून येतें. संपूर्ण पत्र त्याच्याच हस्ताक्षरांतलि आहे.

ले. ११ असल } श्री { श. १६७२ स. १७५०

चिरंजीव राजश्री **नाना** यांसि आसीर्वाद अुपरी श्रीकृपेनें आज पाच साहा दिवस आरोग्य आहे तुम्ही श्वकुशल लिहिणे विशेष निरतर पत्रे दरबारचे विचाराची लिहीत आहेच परंतु शुक्ष्म दृष्टीने दीर्घदर्शित्वे विचार पाहाता केवल राजा मोडून **दर्याबाई** कजिया करून काढून दिल्ही तर **आईसाहेब** राजे होणार पुराणिक मत्री आहेतच अुत्कर्षकाल आलियावर ते सहसा सुमारावर राहाणार नाहीत आईसाहेचास सहसा सुटत नाहीत **गोविंदराव** तो आईसाहेबाचे आहेतच **दाभाडियाची** ममता करू लागतील **बाबूजी नाईकास** अुडअून देतील देव देवराव अुडवितील मागती आम्ही दूर आहोच इतका विकल्प आईसाहेब कष्टी आहेत याजमुले वाटतो सीगटोक पैका मागु लागतील गोविंदरावही अुत्कर्ष काल आलियावर सुमारावर राहाणार नाहीत लोभी आहेत ऐसे मजला वाटते **बाबा** तो या दिवसात अुदास आहेत **सभुसिंगा** जवल बाबाचे गल्याची आण वाहिली यास्तव त्यास मात्र सरंजाम येकदा यावा मग बल जाहले तर खाईल नाहीतर दारू पिअून गप मारून घरी बसतील आहे दो लाखाचा सरंजाम त्यात राअूत चालगीत नाहीत गोविंदरायास दिवाणगिरी अथवा नव सरजामाची कमाविस देअू केली असेलसे वाटते **पिराजी नाईक** मातगा फार यास्तव वाढवणे अुपयोगी नाही परतु वचने गुतली आहेत यास्तव बाब्यावर वराल येकदा याच्या

परतु **फतेसिंग** गरिब आहे त्यापासुन आपल्यास चहू लाखाचा सरंजाम मिलतो तो ध्यावा चहूचा सभूसिंग पिराजी नाईक यास मात्र द्यावा येणे करून आम्हास नफा राज्यामध्यें गोविंद्रायानी पंनासाचा सरंजाम मेलविला आम्ही काहीच ये समई न केले याजमुलें रिकामेच राहिलो गुजराथ तो दूर व आहे **सिहगडामुले सचिवास** पाऊण लाख दिल्हे याखेरीज कर्यात मावलचा मोचद्ला तिसा हजाराचा द्यावा लागतो तो **प्रतिनिधी**कडील अगर हरयेका कडील अैवज बंद करून द्यावा लागतो वरीस दोन वर्षे रुसव्या खाली घालमेली खाली गेलिया दरमाहा वगैरे राज्याकडील देणे व माहालाकडील देणे येवढा अैवज मिलेल तर न कले वरकड पंधरा लाख कर्ज मात्र नवे जाहाले येक फतेसिगाकडील मात्र चहू–चे सरजामाची आशा मात्र धरली आहे सेवटास जाणे ईश्वर इछा असो मनातील अर्थ लिहिला असे राज्याचा लटका लगाम राही **दर्याबाई** जुना सरंजाम सरलस्करचा घेऊन राही आईसाहेबेही हमवार मान्यपुरूष होऊन राहात आपल्यास नफा होई[ल] काही रुसवाही राहून देण्याघेण्यास ढालढकल चाले अैसे या कालात केले पाहिजे **मानसिंग जाधव जीवराव सिंदे** पानगावकर **बाजीराव बावडेकर** यासं काही देऊ नये मालाचे माल बरे काही आपल्या अुपयोगाचे नाहीत अैसे आमचे मनात आहें हे पत्र तुम्ही येकाती वाचून जेणेकरून आपला नफा होय राजाही थोडा बहुत रजावंद राही आईसाहेब मान्यपुरुषपणें राहात अैसा विचार माहीतगिरीनें करून लिहिणें **येमाजीपंताची** माणसे सुटावी हे मनात आहे याचा विचार कसा केलिया सेवटास जाय हे तुम्ही आपले मनात मनन करून लिहिणें सारांश राज्य नासले बुडाले आईसाहेबानी केलिया तेच गत राज्याने केलिया तेच गत कोणासही आमचा अुत्कर्ष सोसवत नाही ज्यास वाढवावे पुर्ते तो भस्मासूर होऊन पाठीस लागणार यास्तव **रघोजी अुदाजी चव्हाण** मात्र लगामी राखावे वरकड जे जेथे मिलेल तें मेलवावे अैसा प्रसंग आता अुपयोगी अैसे वाटते फौज तेथे ठेऊन नाहक खर्च का खाता पैका अगदी नाही पुढें हरयेक नफा जाणून कर्ज खावे हे शाहाणपणास उपयोगी आहे याचे उतर पोरग्याजवल देऊन आम्हाजवल पावे अैसे करणे हे पत्र कोणासही न दाखवणे हे आसीर्वाद

---

नानासाहेबानें स्वहस्तें हें पत्र नाना पुरंदरे यांस लिहिलें आहे. अनेक राजकारणाविषयीं तो नानास लिहीत आहे व "पत्र तुम्हीच वाचणे" असा इषारा देत आहे. छ. रामराजा व दर्याबाई यांच्या प्रकरणांत नानासाहेबाचें मत असें कीं "राजश्रीही रजावंद (संतुष्ट) असता तुटे पावेतो वोढूं नये!" तसेंच छत्रपतीविषयीं निष्ठाहीन असलेल्या व पुंडावा करणाऱ्या यमाजीपंताबद्दल ( यमाजी शिवदेव मुतालीक ) तो म्हणतो " येमाजीपंताची मुलें माणसें आमचे हवाली करावी येमाजीपंतास खातरतखू करून चाकर करून ठेवावा उतम प्रकारे चालला तर उतम! न चाले तर मग अव-

काशानरूप पारपत्य करावे." नानासाहेबाचे सामोपचारी राजकारण या पत्रांत दृष्टीस पडतें.

ले. १२ असल } श्री { शक १६७२ श्रावण शु. ५
इ. १७५० जुलै २७

चिरंजीव राजश्री **नाना** यासि प्रती **बालाजी बाजीराव** प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल छ ४ रमजान जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष साम्प्रत दोन तीन पत्रे तुमची आली की **दर्याबाईस** नवाजुना सर्व सरंजाम द्यावा दोन्ही माहालाकडील खासगी आहे तसी राखून नवा अैवज **आईसाहेबाचे** खर्चास करून द्यावा वरकड सरंजामाच्या यादी **पुणियात** जाहाल्या आहेत त्या प्रा हातरोखे करून द्यावे दरमहा मोकला करावा हे न करणे असेल तर उठोन यावयाची आज्ञा करावी परतु आमचे विचारे या प्रा करावे **राजश्रीही** रजावंद असता तुटे पावेतो वोढू नये राजे सहसा दर्याबाईस सरजाम न द्यावयाची गोष्ट आइकणार नाहीत आम्ही मात्र उठोन येऊ राजश्री जवळ लहानसाहान मिलोन कारभार करू लागतील मातबरातही कोणी इकडे कोणी तिकडे होतील पोटास म्हटले तर यापासी दो वर्षांची बेगमी आहे सारांश की दर्याबाईस सरजाम द्यावा आपणा कडील दरमाहा मोकला करावा राजश्रीची मर्जी संतोषी करून **सभुसिग पिराजी नाईक** यास सरजाम देवावे येतयर्थी विस्तारे लिहिले अैशियास मागे निरतर लिहीत होता की राज्यासी कजीया करून दर्याबाईस काढून द्यावे तो विचार आमचे मनास न ये तीक्ष्ण उपचार न करावा सामोपचारे सर्वही चहू महिनियात होते या प्रा तुम्हास लिहिले असता साम्प्रत येथे दर्याबाईकडील बोलणार आले त्यासी कठीणच जाबसाल तुम्ही पूर्वी लिहीत गेला त्या प्रा बोललो तेव्हा लिहीत होता की आम्ही राज्याचे दर्याबाईचे दावेदार जाहालो स्वामींनी तेथे नरम जाबसाल दर्याबाईकडील कोणी येईल त्याजसी केला म्हणजे आम्हीच फसी पडलो अैसे लिहीत होता येकायेकी दर्याबाईनी तुमची **गोविंदरायाची** मर्जी कसी मेलऊन घेतली आणि तुम्ही या पंधरा दिवसात कोणता नवा पेच विशेष पडला की नरम पडलेस हे कलत नाही असो दरबारचे मुद्सदी जे आहेत ते ज्या पल्यावर येतील त्याचीच साधके हजारो बोलतील व इंद्रजाले उभी करतील नवल नाही येथे दर्याबाईकडील आले होते त्यास वास लागल्यावर उतम प्रकारे नरम जाहाले होते परंतु तुम्ही व गोविंदरायानीं सरंजाम द्यावयाचे कबूल केले तेव्हा त्यानी इकडील बोलणे सोडून तुम्हासीच लाघावल लाविली असेल असो ज्या कामावर जो मातबर यख्तियारी करून ठेवावा त्या कामाचा यख्तीयार त्याजवर द्यावा हे तो आम्हास योग्यच आहे आमचे मते **फतेसीगबावा** बोलल्या प्रा मनापासून कायम असले तर त्यास राखावा त्यापासून आटाचा सरंजाम घ्यावा त्यापैकी तिहींचा सभूसिगास येकाचा पिराजी नाईकास बाकी चहूचा राहिला तो आपण घ्यावा दर्याबाईस

जुना सरंजाम मात्र द्यावा त्याचे लेक येतील दिल्हा सरंजाम खाऊन काये चाकरी करितात कसे आम्हासी सुरलीत राहातात हे साहा महिने पाहून मग आणखीही दोहो-तिहिचा सरंजाम द्यावा हा विचार सर्वोतम आहे **येमाजीपंतावर** नेहमी मसलत करावी तर पाच हजार सात हजार फौज घेऊन येक खासा चार महिने हंगामसीर मेहनत करील तेव्हा **मंगलवेढे सागोले आथनी** ही ठाणी सुटतील यास खर्च दाहा लाख बसेल दरबारचे मुदसदी चोराचे चोटानें विचू मारणार खर्चाखाली मात्र आम्ही यावे यास्तव येमाजीपंताची मुले माणसें आमचे हवाली करावी येमाजीपंतास खातरतखू करून चाकर करून ठेवावा उतम प्रकारे चालला तर उतम न चाले तर मग अवकाशानरूप पारपत्य करावे असे न केलीया मसलत तूर्त दाहा लाखाचे खर्चाची प्राप्त होते हे कोण करतो हा विचार दर्याबाईनी राजश्रीस समजून सांगून येणेप्रा करावे त्याचे कबिले आमचे हवाली करावे आम्ही आपले तर्फेने दर्याबाईचे साहित्यास चुकणार नाहीं कदाचित हे गोष्ट न होय तर येमाजीपंत **माहुलीची गुरे** वळून नेईल त्याचे पारिपत्य दरबारचे मुद्सदी करतील तेही दृष्टीस पडेल याचा विचार तुम्ही आपले मनात पुर्ता करून शोध तजवीज ठाव मनास आणून लिहिणे हे पत्र तुम्हीच वाचणे या पत्रातील मजकुरा प्रा होईसे दृष्टीस पडले तरच बोलणे न होये तर ठास आहे तो बराच आहे सारांश जसा आम्ही **इजतखान** चाकर ठेवितो तसा येमा-जीपंत चाकर करून ठेवावा कबिले सोडावे तरच चालता गाडा होतो हे आसीर्वाद

---

संपूर्ण पत्र नानासाहेबानें स्वहस्तें नाना पुरंदऱ्यास लिहिलें आहे. नानासाहेबाची छत्रपतीविषयीची भक्तिभावना या पत्रांतून व्यक्त होत आहे. “ कैलासवासी महा-राजानी ( छ. शाहू ) ज्यास हातीं दिले त्यास संदेहस्थली ठेवणे हे गोष्ट आमचे रीतीस योग्य नव्हे ” असे तो लिहितो. “ आमचे मते राजश्रीस आमचे आइ-कणे तर दर्याबाईस पानगाव ( व ) आणखी अेकदोन जागिरीचे महाल मात्र द्यावे त्या अैवजाची चाकरी देखील माफ करावी ” तसेच पानगावकर इतर मंडळी बद्दलही नानासाहेबाचें मत “ त्यांचे घरी पोटाची तैनात त्यास देऊन त्यांचे चालवावे” असेंच होतें. अेकंदरींत नानासाहेबाच्या मिळत्या मनोवृत्तीचें आणि छत्रपती संबंधी' च्या आदरयुक्त भावनेचें हें पत्र निदर्शक आहे.

ले. १३ असल } श्री { शक १६७२ श्रावण<br>इ. १७५० जुलै-ऑगष्ट

आसीर्वाद उपरी फौज पाठविली याजमुले राज्यानी दहशत खाऊन सागून दोघातिघा बरोबर पाठविले की ज्याप्रा **पुणियात** कारभार केला आहे त्या प्रा आइकतो **तुग तिकोना सचीवास** देतो **सिहगड** तुम्हास देवितो वरकड **फते-**

**सिंगाची** माया धरीत नाही या अन्वये बोलले असता करीत नाही अैसे म्हटल्यास लटिक वाद येतो याचा विचार करून सत्वर ल्याहावे अैसियास आज ता। **राजश्रीनी** क्रिया बहूत केल्या त्या कोठे सेवटास नेल्या आता दोन दिवस सुरलीत आले याचा भरवसा तुम्हास कसा ईश्वर-मायेने इतक्यात पुरला हे अपूर्व आहे नेहमी **सातारा** हजारो फौज आम्हास ठेवावयास कसे अनकूल पडते दोन वर्षे अशा कामास पंचवीस हजार फौज खराबा केली कर्जदार जाहालो जेव्हां फौजेचा शह नाहीसा देखतील तेव्हां मागती बायकास धरून वस्तवानी घेतील राज्यानी परिछिन संतोषे अथवा गैरसंतोषे दोनीचारी बायकास निरोप द्यावा येखादा गाव द्यावा तेथे ठेऊ या खेरीज केलिया मागती सा चहू महिनियात संधी पाहून तेच गती करितील कारभारात हरयेक कामाकाजा मुळे लटीकवाद आला तर तो पुरवतो परंतु कैलास-वासी **महराजानी** ज्यास हाती दिल्हे त्यास संदेहस्थली ठेवणे हे गोष्ट आमचे रीतीस योग्य नव्हे त्याजविसी हरतरेने बोलून त्याचे निघणे बऱ्यावाईटाने होये तें जरूर करणे कारभाराचे जाबसाल नित्य पुरवले आहेत पावसाला दिवसात नेहमी हा मजकूर ठहरे तोपावेतो महिना दोन महिने फौज ठेवता पुरवत नाही यास्तव त्याचे निघणे **संतूबाईचे** देखील होये ते करून मग कारभार करीत जाणे आमचे मते राजश्रीस आमचे आइकणे तर **दर्याबाईस पानगाव** आणखी येक दोन जागिरीचे माहाल मात्र द्यावे त्यास निरोप द्यावा त्या अैवजाची चाकरी देखील माफ करावी सरलस्कर **संभूसिंग** अगर **साबाजी नाईक** यास द्यावे पानगावकर **नारोजी-काका मल्हारपंत दीनानाथपंत माणकोपंत** यास निरोप द्यावा त्याचे घरी पोटाची तैनात त्यास देऊन त्याचे चालवावे मागती वर्षादोवर्षानी **आईसाहेब** व आम्ही मिळोन सांगू तेव्हा हुजूर ठेवावे सचीवाविसी ज्याप्रा। येथे ठहराऊन लिहून पाठऊ त्या प्रा। करावे **येसाजी कुसाजी** यास पोटास सरजाम ठेवणे तो ठेऊन वरकड मिरजकर व **सिदोजी थोरात** व **गोविंदराव** यास ठहराऊन देणे तो देऊ याप्रा। करावे निदान दर्याबाईस **आपाजी सोमवंसी** या बाबत सरजाम मात्र द्यावा नवा आम्ही कधीही देणार नाही याप्रा। पुणियाहून लिहिले आले आहे खातरेस येईल तर करावे आमच्याने तोडमोड होत नाही अैसे उदासीनत्वही दाखवावे येणे प्रा। केले तर चारी सोई ठीक पडतात न करीत तर रुसवा आहे तो बराच आहे हे आसीर्वाद

---

नानासाहेब यानें प्रस्तुत पत्र नाना पुरंदरे यास लिहिलें आहे. नाना पुरंदऱ्यानें भाऊसाहेबास पत्र विस्तारपूर्वक लिहिलें व आपणास मात्र तसें लिहिलें नाहीं म्हणून नानासाहेब नवल व्यक्त करतो व समजुतीच्या सुरांत पुढें म्हणतो " आम्हास विस्तार-

पूर्वक लिहिले तर भाऊ काही वाईट मानणार नाही. भाऊस विस्तारपूर्वक लिहिले यांत आम्हास संतोषच आहे; परंतु आम्हासही विस्तारपूर्वक लिहावे."

नानासाहेब, भाऊसाहेब व नाना पुरंदरे या तिघांच्या मानसिक अवस्था दर्शविणारें चित्र या पत्रांत आहे. पत्र नोव्हेंबर १७५० च्या सुमाराचें असावें. पत्र संपूर्णपणें नानासाहेबाचे हस्ताक्षरांतील आहे.

ले. १४ असल } श्री { शक १६७२ कार्तिक मार्ग०
इ. १७५० नोव्हेंबर

चिरंजीव राजश्री नाना यांसि प्रती **बाळाजी बाजीराऊ** प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही भीत भीत पत्र लिहिले हे अपूर्व आहे आम्हास विस्तारे पत्र लिहिले तरी भाऊ काही वाईट मानणार नाहीत चिरजीवास तुम्ही काही विस्तार लिहिले तरी आम्हास तो संतोषच आहे असे असता संशये धरित धरीत लिहिता हे अपूर्व आहे **बाबास** पत्र लिहिले आहे या प्राा करीत ते करणे **रामाजी पंतावर** व्यर्थ निमित्य येईल यास्तव बोलाविले होते सिके जामदार खान्यात ठेवावे देणे घेणे घरचे काम गोविदपंत अथवा आणखी कोणी लिहिणार ठेवावा दोन महिने हे व्यर्थ निमित्याचे दिवस यास्तव आंणावयाविसी लिहिले पुढे श्रीइछा प्रमाण तिलमात्र संशये न धरता सविस्तर वर्तमान लिहीत जाणे नाईक फजीत पावले व **मल्हारबा** समजले येणेप्राा जाहाल्यास इकडे काही मिलेल व जे लचाडी मोगलाईतील करतील ते फजित पावतील सोय पडेल जे येकनिष्ट त्यानी स्वामीचे हित ते करीत असावे बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

रामराजा व ताराबाई प्रकरणांतला मजकूर खालील पत्रांत आहे. नानासाहेबानें पत्र नाना पुरंदऱ्यास लिहिलें आहे " राजश्रीचे व मातुश्री आईसाहेबाचे ( रामराजा व ताराबाई ) येणे ( साताऱ्याचे किल्ल्या ) खाली होये ते करणे, कोणेविसी गडकरी संशय न धरीत ते करून बेवसवास राहात, उभयेतांस खाली आणीत, ते करावे. ते ( गडकरी ) आमच्या विचारे चाललियावर आम्हापासून त्यांचे अनिष्ट सहसा होणे नाही " असें आश्वासन तो देत आहे. शेवटीं निराळें अक्षर नानासाहेबाचें.

ले. १५ असल } श्री { शक १६७२ मध्य
इ. १७५० नोव्हें. अखेर

आसीर्वाद उपरी **सातारकर गडकरानी** राजश्री **बाबाच्या** वर्तमानावरून चपला खादला आम्हांसी बोलत होतें ते काहीं बोलेनासे जाले आहेत आमचे मध्यस्त गडावर दोघे जात येत होते त्यातील येकास मात्र गडावर घेंतले येकास घेतलें नाहीं काये चिता आहे फिरोन त्यास विचाराल आणितों **राजश्री**--[ मो. फा. ] च्या

येण्यास मात्र चार रोज विलब लागला गडकरासीं निग्रह करीन म्हटल्यास अुतम नाहीं विचारे विचारे सर्व करून म्हणोन कितेक लिहिले ते कळले अैशांस बाबाच्या वर्तमानावरून गडकरानी चवकावें असे नाही गडकरी पदरचे पहिल्या पासून आमच्या विचारात अहित त्याचप्रो त्याणीं आमच्या विचारे वर्तावे यांत त्याचे कल्याण असे तुम्हीं त्यास अुतम प्रकारे सागावे विस्वास पुरेसी त्यास शफत देअून खातरजमा करून **राजश्रीचे** व मातुश्री **आईसाहेबाचे** येणे खाली होये ते करणें कोणेविसी गडकरी संशये न धरीत ते करून बेवसवांस राहात अुभयेतांस खाली आणीत ते करावे ते आमच्या विचारे चाललियांवर आम्हापासून त्याचे अनिष्ट सहसा होणे नाहीं [ नि * ] अलाहिदा **गोविंदरायास** विस्तारे लिहिले आहे त्यानी ध्यानावर घेऊन दूरंदेशीने केलीया सर्व उतम होईल येकदेशी प्रकारच करितील तर आम्हास शब्द नाही त्यानी मनावर घेतल्यास अवघड नाही विस्तार काये लिहिणे हे आसीर्वाद

---

पुढील दोन्ही पत्रें क्र. १६ व १७ उमाबाई दाभाडे हिच्या संबंधींचीं आहेत. क्र. १६ तील निराळें अक्षर नानासाहेबाचें व क्र. १७ पूर्णतः त्याच्याच हस्ताक्षरांतील आहे.

ले. १६ असल } श्री { श. १६७२ मार्गशीर्ष व. ८ / इ. १७५० डिसें. १०

चिरंजीव राजश्री **नाना** यासिं प्रती **बालाजी बाजीराव** प्रधान आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। छ २१ मोहर [म] जाणून स्वकीये लिहिणे विशेष येथील वर्तमान तरी पंचवीस लक्ष द्यावे येक अथवा आताच समागमे चलून निमे मुलूख वाटून द्यावा त्यास रुपये त्यानी कबूल केले परंतु तूर्त रोख दाहा द्यावे त्याची निशा त्याच्याने होत नाही **दमाजी गाईकवाडाचा** लेक अथवा **देवजी ताकपीर** महालकरी व सावकाराची निशा करतील तेव्हां होईल दमाजीचा लेक लाहान देवजी ताकपिरावर **उमाबाईचा** पेच परंतु **अंबिकाबाईचा** लगाम आहे परतु मुलूक हाती नाही ज्याचे हाती मुलूक त्यासी देवजीसी अुभा दावां **सेनापती** मात्र लटकाच आव जुझावयाचा दाखवितात परतु फौज थोडी गाव **इदुरी व नदीचा डोह** आश्रा करून राहिले आहेत पळण्याने निभाव न होये बाहेर तमाम चौक्या आमच्या पुर्ता चिवाड जाहाल्यास टिकावही न होये कदाचित ढासणामुळे टिकली तरी वैरण दाणा लस्कर च्यार हजार त्याचे कोठन खावा अैसा अर्थ आहे साप्रत **जानोजी ढमढेरे सटवोजी जाधव** मध्यस्तीस गेले होते त्यानी देवजी ताकपिरास काल घेऊन आले **उमाबाई अंबिकाई** ही येणार येका दो दिवसात श्रीकृपेने घडेल ते लिहून पाठऊ वरात बाहेर कुचोद्य फार याजमुळे नेट लागून कार्यसिधी लौकर होत नाही काही दिवस गुता आहे जे ईश्वरे नेमिला लाभकाल तो होईलच हे आसीर्वाद

---

ले. १७ असल } श्री { शक १६७२ मार्ग. शु १० इ. १७५० नोव्हें. २७

आशीर्वाद उपरी **उमाबाई** भेटली बोलीचाली जाली असेल ते लेहून पाठवावी म्हणोन लिहिले ते कलले उमाबाई बुधवारी आली भेट जाली ते दिवसीं तर भेटीखाली व त्याचे स्नान देवपूजा जेवणाखाली मध्यरात्री जाली तो दिवस गेला दुसरे दिवसा पासून दिनचर्येचे वर्तमान तर दोन प्रहर पर्यंत निजतात तदोत्तर उठतात तोंड धोन [स्नान व] देवपूजा जेवण मध्यरात्र पर्यंत व करितात त्याचे कारभारी यांस बोलाऊन आणितों ते सालजाब नम्र करितात परंतु त्यात मुलुक यावा हे नाही धातुपोषण कालहरणाच्या गोष्टी बोलतात बुधीच्या वाटेने यांचा आमचा बनाव बनेल असे नाहीं आम्हीं निकडीनें सालजाब करा होईल तर येथास्थीत आमचे मुदेमाफीक बोला न व्हे तर साफ सांगा म्हणतच आहों या उपर जो सालजाब ठहरेल तो तुम्हांस लिहिले जाईल सारांश **तलेगावी** राहून हजार तन्हेनें अवाया सोसाव्या त्यात कसे होईल न कले वास्तव येथे येऊन स्वस्थ राहिली आहेत असो ईश्वरे निर्मिले असेल ते घडेल [नि *] चहूपाचा दिवसात गोष्ट तुटेल त्यास भरवसा अतर्यामी **ताराबाईचा** फार व राजमंडलचाही फार आहे गाईकवाड बदमस्त दीर्घदर्शी नव्हे ते तो डावाखाल्यावाचून आईकती [ल] असे दिसत नाही थोड्याच [दि] वसात रग निवडेल असे आहे छ ७ मोहरम हे आसीर्वाद

---

नाना पुरंदऱ्यास नानासाहेब हें पत्र लिहीत आहे. तो स्वतः सातारचे गडात ताराबाईनें अडकवून ठेवलेल्या रामराजास व ताराबाईस ही "हर तजविज खाली आणणे" म्हणून तो लिहितो. दमाजी गायकवाडाचीही हालचाल देऊन इतर कांहीं सर्वसामान्य बाबी तो लिहीत आहे. शेवटीं निराळें अक्षर नानासाहेबाचें. पूरक पत्र पुरंदरे दप्तर भा १ ले. २९४.

ले. १८ असल } श्री { शक १६७२ माघ शु. ११ इ. १७५१ जाने. २७

चिरंजीव राजश्री **नाना** यासि **बालाजी बाजीराव** प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिंहिणे विशेष प्रस्तुत तुमचे पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी वरच्या वरी लिहीत जाणे येथून राजश्री **अणापा** पाठविले ते तेथे पावलेच असतील मातुश्री **आईसाहेब** व राजश्री यांचे खाली येणें जाहाले असेल नसेल तर कराल इकडे अुमदा मनसुबा प्राप्त जाला आहे अवरंगाबादेचा गुता अुरकला अतःपर आम्ही मजल दरमजल भागानगरच्या रोखे जातों फौज बाा मातबर असिली पाहिजे **मातुश्रीचे** व **राजश्रीचे** खाली येणे हों अगर न हों तुम्हीं रा

म्हालोजी सुर्डे वगैरे पथके पांच सासे राऊत ठेऊन घेऊन राजश्री **गोपालराव गोविंद** व **चिमणाजी बापूजी** या उभयेता पथकास पत्रदर्शनी पाठऊन देणे विलंब न लावणें [नि *] तीन हजार फौज तेथे असली तरी मोर्चे होणे कलतच आहे लौकर दोनी पथके पाठऊन देणे आवरगाबादेचा गुता अुरकला भागानगर प्रांते पैका मेलऊन सारे जमा करीत पुढे जाऊन खानदेशातून **गाईकवाड** सोनगडाकडे चालले आहेत गेले तह नीट जाला तर अुनम खानदेशातच फिरा (गे) लागले तरी येकजण कोणी जाऊन समाचार घेईल देसी फौजही आठ दाहा हजार देखील खानदेश **बापूजी बाजीराऊ** गंगथडीस ठेविले **गाईकवाडाचाही** मजकूर दो चो रोजात कलेल त्यासारखे **दाभाडे** येथे आहेत त्यास पुसून पलीकडे समाचार घेऊन हातज-विजेने राजे आई खाली आणणे तुमचे कामकाज सर्वांचि लगावाने चालावे ते चालेल पाच सातसे राऊतही जवल राहातील येथून पैका पुण्यास रवाना केला पंनास तेथून तुम्हाकडे येतील दरबारचा पैका तूर्त न देणे आपला मात्र ससार करणे आपला खर्च महिना देखील पाचसासे राऊत दाहा पंधरा हजार होतील या आजमासे पंनास हजार पाठविले आहेत रा छ ९ रालावल हे आसीर्वाद

---

ताराबाईनें रामराजास साताऱ्च्या किल्ल्यावर अडकून ठेविले त्यासंबंधीचें हे पत्र आहे. रामराजाचा बंदोबस्त ताराबाईनें किती केला होता हें ह्या पत्रावरून स्पष्ट दिसतें. तसेंच "आमच्या घरावर गडावरून धोंडे लोटतात" अशी अनुपेक्षणीय तक्रार पुरंदरे करीत असून सुद्धां नानासाहेब लिहितो — "प्रस्तुत धोंडें लंवडू लागले! घरात रहावेल तों रहावें किंबहुना फौजेत राहिले तर चिंता काय? ... आईसाहेबासी बोलणे गोड ते मर्यादायुक्तच बोलत जाणे ...... अंतर पडू न देणे" नानासाहेबाची शांत व सतत तडजोडीनेंच घेण्याची वृत्ती यांत दिसून येते. पूरक पत्र पे. द ६ ले. १४६

ले. १९ असल } श्री { श. १६७२ माघ मध्य<br>इ. १७५१ फेब्रु. सुमारास

आसीर्वाद उपरी मातुश्री ——— **आईसाहेब** दिवसे दिवस माणसानी माणोस जथीन जातात किलें कोटाचा सरजाम करितात खर्चाविचास व वस्त्रे गडकरीयास देतात राजश्री [मो. जा.] जवल कोणी बोलू न पावे राजश्री जवल खिजमतगार पोरेंठोरें होती तीं देखील दूर केलीं **येसाजी भोसले** यांजकडील **सुभानजी सूर्यवंशी** यांस च्यार हजार फौज ठेवावयाची आज्ञा केली परस्पर जाबसाल जाला तो मजकूर व गडकी गलादाणा गडावर नेतात आमच्या व राजश्री **गोविंदराव** याच्या घरावर दगडी लवडितात की हरकसीं कल करावीं त्यास आम्हीं कजियांची गोष्टी करीत नाहीं

ते तो नवेनवे करितात स्वामींनी अतःपर या मनसुबियाची उपेक्षा न करावी उपेक्षा केलियांस फार फार जड पडेल म्हणोन तपसिले लिहिले ते कलले ऐशास आईसाहेबाच्या व गडकराच्या चितात कल करावी कजिया पाडावा आम्ही जबरदस्त यांस्तव आमचे वाईट लोकोतर करितात कजिया केलियावर आम्हांसच वाईट करून दाखवितील यांत संशये नाहीं आपण होऊन कजिया अमर्यादा न करावीं म्हणोन तुम्हांस वारंवार लिहिले तुम्हीं सबुरी केली उतमच केले प्रस्तुत थोडे लवडू लागले घरात राहावेल तों राहावें किंबहुना फौजेत राहिले तर चिता काये परंतु आपणापासून अंतर पडू न देणे आईसाहेबासी बोलणे ते गोड मर्यादायुक्तच बोलत जाणें मागाहून विचारे करून तुम्हांस लिहिणे ते लिहिले जाईल सारांश आपले जागा बहूत खबरदार राहाणें रा गोविंद्राव येशवंतराव यांजसी कजिया करून गडावर नेणार आहेत म्हणोन लि॥ तर [ नि ❊ ] भरवसा नसता जाऊ नये जबरदस्तीने राहावे गोपालरायानी निर्भीडपणे आपला तालुका राखावा सिदोजी थोरातास तुम्हीही अतस्ते लिहिणे तजविजेनेच दाव करून जागाजागा केले न चाले ते करावे केवळ जवलील मात्र सभाळून करावे आपले तर्फेने उदास जाबसाल करावा पैका येकंद्र देऊ नये हे आसीर्वाद

---

'जेणे करून दामाजीवर आपला शह बसून तो जेरीस व शरण येईल' अशा तऱ्हेची धूर्तता व सावधता ठेवावी असें नानासाहेब नाना पुरंदऱ्यास बजावीत आहे.

वास्तविक दमाजीचा मोड सातान्यास गेंड्याचे माळावर १५ मार्च १७५१ रोजीं झालेला होता; परंतु प्रस्तुत पत्र लिहीपर्यंत ही बातमी नानासाहेबास कळली नव्हती म्हणून त्यानें नाना पुरंदरे यास पत्रांत इषारे दिले आहेत. पत्र संपूर्णपणें नानासाहेबाचे हस्ताक्षरांतील आहे.

ले. २० असल } श्री { शक १६७३ चैत्र व्र. १ / इ॰ १७५१ मार्च ३१

पुा चिरंजीव राजश्री **नाना** यांसि आसीर्वाद उपरी तुम्ही सर्व जमा जाहाला आहा परंतु **गाईकवाड** शहगत दम धरील पूर्ता लुटल्या वाचून फिरोनही येखादे वेलेस आरबाचे आश्रियाने जुझेल तुम्ही वेडेपणे चढी न लागता सर्व मिलोन सावधतेने जरब देणे अगर वेढा घालून राहाणे आम्ही येतो घरातील बाहेरल मुदसदी मिलोन निकाल काढतील त्यास फौज सुधा माघारी लाऊन घ्यावा म्हणतलि त्यास तुम्ही व **बापू** मिलोन नेट धरणे लक्षा प्रकारे जर त्याजवर जरब उतम बसली तर तो पळूनच जाईल **सेनापति** मात्र किल्यावर जातील इतक्या दिवसात हरयेक प्रकारे तुम्ही विल्हे लाविले असेल न केले त्यानी जागा धरली तुम्ही बाहेरून असला तर मात्र आठदाहा दिवस नट राहीलसे वाटते परंतु रात्रंदिवस सावध व येक विचार होऊन उतम प्रकारे जरब

देणे येकदा त्याने आमची फौज मोडली गर्वें करून गेले बातमी नीट न राखिता मार आरबाचा खाला आता सावध जाहाली तुम्हीही मातबर फौजेने मिलाला याजमुळे तुम्ही त्यास रेटून गावात घातले फिरोन आडानीपणे जुझाल तर चागले माणूस गोल्यानी जाया होईल तुम्हास कठीण पडेल अैसे कितेक प्रकारे भेदभाद पक्ष किती गोष्टी आहेत यास्तव नेटाने व सावधतेनें कार्य करणे छ १४ जमादिलावल हे आसीर्वाद

---

काडलूर मुक्कामाहून नानासाहेब नाना पुरंदऱ्यास लिहीत आहे. मुरारराव घोरपड्याची भेट झाल्याचें लिहून दमाजीच्या लढाई विषयी कांहीं सूचना तो करीत आहे. वास्तवीक दमाजीचा पराक्रम यापूर्वीच मार्च १५ ला झाला होता. नानासाहेबास त्याचें वृत्त कळलें नव्हतें. शेवटीं निराळें अक्षर नानासोांचें हातचें.

| ले. २१ असल | श्री | शक १६७३ चैत्र व. ४<br>इ. १७५१ अेप्रील ३ |
|---|---|---|

चिरंजीव राजश्री **नाना** यासि **बालाजी बाजीराव** आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्हीं पत्र छ ६ जालौवलची पाठविली ती छ १६ मिनहूस पावली **गाईकवाडांचें** पहिलें युध्य जालें त्याचे वृत व छ ६ जालौवली राजश्री **मानाजी पायेगुडे गायकवाडाचे** चोकीवर उठोन झिटपीट जालियांचे व राजश्री **बरानजी मोहिते** आदीकरून तिकडे जालियांचे वृत लिहिले व आपले लोकाचा मजकूर लिहिला तो कलला अैसीयांस **गाअीकवाडानी** शहरचा आश्रा करून ढांसणे धरून बैसला असतां अडचणींत तुम्हीं घालमेल करावीं असा अर्थ नाहीं तो आसरा करून आहे तैसा असो देणे तुम्हीं वेणा पुढे देऊन आहा ते बरेच आहा आम्हीं काडलूर संगमास आलों राजश्री मुरारजी घोरपडे भेटीस आले त्याची आमची भेटी आजी छ १६ जालौवल मंगलवारी जाली बोलीचाली होऊन यां (सी) आपलेसे करून येका दो रोजात निरोप देऊन चिरंजीव राजश्री भाऊ बराबर फौज देऊन अति त्वरेने तिकडे पाठवून देतों राजश्री **उदाजी चव्हाण** आले त्यासहीं चिरंजिवाबराबरच पाठवून देतों तोपर्येत तुम्हीं जुझांची उतावली न करणे गाईकवाडाचे कहीकबाड बंद करून बहूत खबरदार राहाणें वर्तमान वरच्यावरी लिहीत जाणें सारांश तो आश्रये करून राही हे बाहेर न निघता आपण ढासणावर जावे लोक जाया करा उत्तम नव्हे करवीरचे बातमीचे वगैरे कागद पाठविले ते पावलें [ नि* ] छ १७ जमादिलावल हे आसीर्वाद

---

दमाजी गायकवाडाचा साताऱ्यास मोड झाल्यावर हें पत्र लिहिलें गेलें आहे. नानासाहेबास मात्र दमाजी पराभूत झाल्याचें वृत्त अजून कळलेलें नाहीं. दमाजीच्या

हालचालीविषयीं सविस्तर माहिती नानासाहेब मागत आहे. तसेंच दमाजीकडे फितून गेलेले स्वपक्षीय कोण कोण आहेत याविषयींही दक्षता घ्यावी. कारण त्यांचा-हि समाचार घ्यावा लागतो हें सांगण्यास नानासाहेब विसरत नाही. पत्र पूर्णतः नाना-साहेबाचे हातचें.

ले. २२ असल } श्री { श. १६७३ चैत्र व. ११
इ. १७५१ अप्री. ११

आसीर्वाद उपरी **गाईकवाडाची** फौज होती किती आता आहे किती हशम किती आहे **तुलाजी आगरे** याजकडील सरजाम काये आला त्याजपासी आरब किती करोल किती जागाजागा कोण कोणते नाके बांधले आहेत कसे जुझतात कही कसी कोणकिडून आणतात हे सविस्तर वर्तमान लिहीत नाही हे उतम नव्हे येथे लोक नाना प्रकारे गपा मारितात तरी सविस्तर जरूर मनास आणून लिहीत जाणे छ २५ जमादिलावल हे आसीर्वाद **गाईकवाडाकडे** आमचे मुलकातील लोक कोण कोणते आहेत हे ठिकाणी लावणे त्याचे घरी समाचार घ्यावा लागेल हे आसीर्वाद

---

नानासाहेब हें पत्र स्वहस्तें नाना पुरंदऱ्यास लिहीत आहे. रामराजा प्रकरणा-विषयीचा मजकूर यांत आहे. "करवीरवासियाचा पक्ष धरावा तर हा राजा जिवंत असता ऐसे केलिया इमान राहात नाही" हें त्याचें वाक्य त्याच्या स्वभावधर्माची ओळख करून देणारें आहे. खानदेशांत पुंडावा करीत असलेला दमाजी, तसेंच ताराबाई व निजाम यांच्या पेचांत नानासाहेब आहे. तेव्हां ह्या घरच्या पेचाविषयीं "भारीपणे चारी विचार करून करीत जाणें" असा सल्ला तो पुरंदऱ्यास देत आहे.

ले. २३ असल } श्री { श. १६७३ मार्गशीर्ष पौष
इ. १७५१ अखेर

आसीर्वाद उपरी तुम्ही पाच प्रकार लिहिले ते यथार्थ परतु येकायेकास येक मातबर दोष आहे **शाहूमहाराजापासी** होते तैसे असावे तर जे जे आमचे पक्षी लागले त्याचे त्यास वाईट करणे तेव्हा आमचे पक्षीचे कोणी नव्हते सर्वावर सर्वाप्रा तो खावंद कृपा करीत होता आता त्यानी जे जे आमचे पक्षीचे असतील त्याविसी आमची रजयदलं आयकून हरयक रकमेवर ठेवावे म्हणजे आम्ही पूर्वस्थितीप्रा राहु ते त्यास करणे नाही आम्हास जे आमचे पक्षीचेसे त्यास वाटले असतलि त्यासनी सजा बहूत करणे यास इलाज ईश्वराचे हाती आहे **करवीरवासीचा** पक्ष धरावा तर हा राजा जिवंत असता ऐसे केलिया इमान राहात नाहीत व किले आमचे लगामी नाहीन रघोजी आदीकरून सरदार कोणीकडे डोल देतील हा भरवसा नाही याचीही

दुरंदेशी फार आहे तिसरे प्रकाराचे उतर जर चौक्या बसवाव्या तर आम्ही लाव मोठे मनसब्यास ईश्वरावर तवकल करून चाललो तुमची पुस्तवानी कोण करितो चौक्यास दगा जाहाल्यास उतम नाहीं **गमाजीपंत अताजीपंत** फोजेचीही तर्तूद करितील याजमुले कलह वृधीच होईल जर मोगलाचा पेच उपस्थित जाहाला नसता तर तेही चौक्याचा प्रकार कामास येता आता सेवटास जाणार नाही तूर्त आम्ही लावलो याजमुळे सारांश आपले जबरदस्तीने राखावे जे जे आपले लगामी असतील त्याची कुमक करून तेही राखावे **आईसाहेबासीही** आणाया समागमे सागुन पाठविले त्या अन्वये बोलतच जावे ईश्वरे कृपा केली आणि मोगलावर सलाबत बसवून आलो तर घरचा हरयेक पर्याय ठहरेल राहाणार नाही **रघोजी फतेसिगही** इकडे बहुता प्रकारे भेटतील त्या ऊपरही विचार करू तूर्त आम्हास येक शह **गाईकवाड** दाहा हजारानसी खानदेश लुटितो दुसरे आईसाहेब तिसरे मोगल फौज जागाजागा गुतली सलाबतीचे सरदार दूर पडले वास्तव दोन कामे चालत्या गाड्यावर घेऊन मोगलाचे केले पाहिजे जर मोगलाचे टाकावे तर तोच चालून येईल सर्व येक होतील जर बाहेर सलाबत राखली तर घरचा निकाल श्रीकृपेने पडेल तुम्ही भारीपणे चारी विचार करून करीत जाणे हे आसीर्वाद

---

पानिपतच्या पराभवाचें वृत्त समजल्यावर नानासाहेब अनेक गोष्टींची माहिती नाना पुरंदऱ्यास विचारीत आहे. संपूर्ण पत्र त्याच्याच हातचें.

| ले. २४ असल | श्री | शक. १६८२ माघ शु. ८<br>इ. १७६१ फेब्रु. १२ |
|---|---|---|

आसीर्वाद उपरी **दिली** कडील वर्तमान वरचेवर येई ते करणे आबदाली कोठे आहे लढाईत त्याजकडील सरदार कोण का ( को )ण जाया जाहाले दिलीत पातशाहा कोण करणार जाटाचे साडणीस्वार चिरजीव **भाऊसाहेबाकडे** गेले होते ते आले की नाही आले असिले तर **आलाजाटाचे** मुलकातून आले की भाऊसाहेबास भेटून आले हे कचे वर्तमान लिहिणे जाटा बरावर अती स्नेह करावा **रुपराम** याचा व चिरजीव रा **दादाचा** अती घरोबा सर्व प्रकारे भरवसियाचे ते त्यासी बोलून **अबदाली** कडील बातमी व जाटाचा स्नेह चिरजीवाकडील बातमी उतम येई हे तो तुम्ही केलेच असेल परतु लिहिल्या प्रा अतीस्नेह करून बातमी उतम राहे ते करणे छ ९ रजब हे आसीर्वाद

---

प्रस्तुत पत्र नानासाहेबांनीं नाना पुरंधरे, विठ्ठल शिवदेव विंचोरकर या दोघांस मिळून लिहिलें आहे. पत्रांतील मजकुरावरून पानिपतचें युद्ध होऊन त्यांत मराठ्यांचा

नाश झाला हें वृत्त नानासाहेबास समजलेलें दिसतें. परंतु भाऊसाहेब खरोखरच मृत्यु पावला किंवा परत येणें शक्य आहे याविषयीं मात्र त्याचा निश्चय झालेला नाहीं. अशा स्थितींत भाऊ मेला हें निश्चित झालें तर उत्तर हिंदुस्थानांत काय परिस्थिती होईल व तीवर आपण काय उपाय केला पाहिजे हें या पत्रांत सांगितलें आहे. पत्रांतील नानासाहेबांच्या मनःस्थितीचें निदर्शक असें पुढील वाक्य ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तो म्हणतो "हें पत्र निदानीचे! येकले तुम्ही, विठ्ठलपंत, गंगोबा असे मात्र बसून मंत्रभेद न व्हावयाच्या शफता करून दोनदा वाचणें यात गप्पा धैर्याच्या नाहींत व घाबरेपणही नाही समयोचित जवल आलो यास्तव लिहितों"

पत्र संपूर्णपणें नानासाहेबांचे हस्ताक्षरांतील आहे.

| ले. २५ असल | श्री | शक १६८२ माघ शु. १४<br>इ. १७६१ फेब्रु. १८ |
|---|---|---|

चिरंजीव **नाना विठ्ठलपंत** यासी कालगत कठीण अद्याप भाऊचे ठिकाण लागत नाही आधी वाईट प्राप्त जाहाले तर कसे करावे ते उघडून लिहितो **भाऊही या लोकातून गेला तर हिंदुस्तानची दौलत गेली** तुमचा आमचा धीर तो आहे येणार येवढे आशेवरते आठापंधरा दिवसात तुटेल जर तुटली आशा तर मग सात हजार फौज नवी तुम्हाकडील फौज मोडली काही कामाची नाही सात हजार फौजेने काही **अबदालीची** टकर अथवा या देशीचे राजेरजवाडे राखवत नाहीत विठ्ठलपत म्हणतील की मी काही होऊ ग्वालेर राखीन परतु येक माणूस जवल राहाणार नाही तेव्हा येकले काये करतील तेव्हा ग्वालेर जाटाचे पलीकडील व आलीकडील याचे हाती जाऊन देऊ नये **वोडसेकर दतियेकर** अथवा **खाडराया** याचे लेकाचे हवाली करावी बाह्य रगे आव भरावा परतु निदान भाऊ नाहींसेच जाहाले तर दौलत जाते गेली ते हिदू संस्थानिकास द्यावी परंतु पलीकडील जाट [1]मुलसमानास जाऊ देऊ नये या प्रांती हे जोरभारी जाहाले कमावीसदार सिबंदी वाईट या देशीची ठेवितात याच्याने निभाव जमीदाराने फिसाद केली तर होऊ सकत नाही मग अशा वडवानलापुढे कोणाच्याने उभे राहावत नाही **दिलीहून** पलाला यानी वेढा घातला तो फार थोडा हे दुगट आहेत आता पत्रे गेली बहुत माझी तरी येता न ये आलिया ते सर्व मिलोन तिकडे परिछिन फिसाद करतील **बसालतजंग** कर्णाटकास लाब जाणार असता **बलवंतराव गोविद बलाल** मारले गेले येवढे खुषखबरीवर माघारे फिरले सारांश असे कालात चिरंजीव **दादाचे** येणे होत नाही येऊन तही गमाऊ नये इतका विचार भाऊ नाहीसाच जाहाला तर जर ईश्वरे अघटित लाभ देऊन चिरंजीव भाऊस आणून बुदीपावेतों अजमेरी पावेतो दिल्हे त्याचे हातचे पत्र दिल्हे

१ येथें ल स हीं अक्षरें मागेपुढें पडलीं आहेत.

तर तेवढ्यावर दो महिनियांत चिरंजीव दादा येतील चिरंजीव भाऊदादा नवी फौज मी मंत्रज्ञ मात्र सर्व ईश्वर उतम करील हे पत्र निदानचे येकले तुम्ही **विठ्ठलपंत गगोबा** ऐसे मात्र बसून मत्रभेद न व्हावयाच्या शफता करून दोनदा वाचणे यात गपा धैर्याच्या नाहीत व घाबरेपणही नाही समयोचित जवल आलो यास्तव लिहितो नाना हा समये नात्यापेक्षा धैर्य अधीक करून लिहिल्या अन्वये समयोचित करावे छ १२ रजब मुा मेलसे

---

नानासाहेब पेशव्याचें नाना पुरंदऱ्यास लिहिलेलें पानिपतनंतरचें हें पत्र आहे. गोहदचें ठाणे निश्चयपूर्वक हस्तगत करावें,' 'मल्हाररावाकडून गल्यावर हात ठेऊन श्रमपूर्वक ठाणे घेण्याविषयी आश्वासन घ्यावे' असें निक्षून नानासाो सांगत आहे. नारो शंकरानें पानिपतावर मराठ्याचा भयंकर मोड झाल्याचें कळल्यावर दिल्ली सोड-ली. त्यावेळी त्यानें दिल्लीचा खजीना बरोबर आणला किंवा नाहीं हें कळविण्या-बद्दलही लिहिलें आहे." चिरंजीव ( भाऊसाहेब ) श्रीकृपेने पुष्करास आल्याचें पत्र येईतों गोहद आली तर बरें जाहाले, नाहीतर सर्व मुलूख सोडवा या प्रा कबूल केले ( मल्हाररावानें ) तर तुम्ही येणे.'' या वाक्यावरून नाना साहेबास भाऊबद्दल वाटणारी आशा व भाऊ नच आला तरीही सर्व मुलूख सोडविण्याची त्याची कळकळ, उमेद व मल्हाररावा बद्दलचें मत दिसून येतें. शेवटचें निराळें अक्षर नानासाहेबाचें.

| ले. २६ असल | श्री | शक १६८२ फाल्गुन शुद्ध ३<br>इ. १७६१ मार्च ९ |
|---|---|---|

चिरंजीव राजमान्य राजश्री **नाना** यासी आसीर्वाद उपरी **झासी** प्राती **नारो शंकर** व **सदासीव रामचंद्र** यास सत्वर रवाना करणे **बाबूराव कोन्हेर** यास हुजूर रवाना करणे रा **मल्हारबास** [1] सागोन **गोहजच** ठाणे खामखा घेवणे तुम्ही तूर्त हुजूर न येणे तुम्ही व **विठलपंत** तेथे राहिल्यास हरयेक प्रकार निकाल निघेल यास्तव तेथेच राहाणे जी राजकारणे असतील ती **महिपतराव चिटणीस** याजबरोबर सागोन हुजूर प ठवणे ते सविस्तर निवेदन करितील **राजश्री बाबूजी नाईक त्रिबकराव सिवदेव** व **शाहाजी सुपेकर** यास **पुष्क क** [1] **रा** कडे रवाना करणे **दिलीं**तील खजाना नारो शकरा बरोबर आला काये राहिला काये हे लिहिणे [ नि* ] तुम्ही कार्य हरतरेने गोहदचे करणे मल्हारबा जवल आपले गल्यावर हात ठेऊन की खामखा गोहदेस श्रम येक महिना करावे यावतर **चिरजीव** श्रीकृपेने पुष्करास आल्याचे पत्र येईतो गोहद आली तर बर जाहाले नाही तर सर्व मुलूक सोडवा या प्रा कबूल केले तर तुम्ही येणे छ १ साबान हे आसीर्वाद

---

१ अधिक पडला आहे.

रघुनाथ बाजीराव कर्ज मिळवून पाठविण्याविषयी नाना पुरंदऱ्यास हें पत्र लिहीत आहे. प्रत्यक्ष युद्ध चालू असतांनाहि पेशव्यांच्या लष्करास पडणारा पैशाचा तुटवडा दर्शविणारीं अनेक लढायांतील पत्रें उपलब्ध आहेत. त्यांतच ह्याही पत्राची भर पडत आहे. बहुधा पानिपत नंतर राक्षसभुवनची लढाई होईपर्यंत जो निजामाशी पेशव्यांचा इर्षामर्ष झाला त्यांतीलच प्रसंगविशेषीं हें पत्र राघोबानें नाना पुरंदऱ्यास लिहिलें असावें असें वाटतें. शेवटीं निराळें अक्षर राघोबाचें.

ले. २७ असल } श्री { शक १६८३ नंतर
इ. १७६१ नंतर

चिरजीव राजश्रीं **नाना** यासी **रघुनाथ बाजीराव** आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष हरयेक प्रकारे गुदराण जाली आता वोढीचा प्रसंग फार जाहाला तो कोठवर ल्याहावा यास्तव तुम्हास लिहिले असे तर सामखा आमची कुमक करणे हे पत्र दाहा पत्राचे जागा समजोन तर्तूद करणें रुाये पाठवाल त्याप्रमाणे खते पाठऊ सारांश **मोगलाची** बाजी मारल्यावरी आधी रुपया पांवेल या दौलतीचे इष्टचिंतक तुम्ही आहा जितिकी शर्त होईल तितकी करून कर्ज मेलऊन पाठवणे रा। छ ११ रालाखर [ नि * ] तुम्हास तपसिल लिहिणे नाही जे होईल ते करालच हे आसीर्वाद

---

# २ रविराव शिंद्यास थो. बाजीरावाचें बोलावणें

[ श्री. ब. मो. पुरंदरे, पुणें ]

लोणी कंद (ता. पुणे. जि. पुणें) येथील माझे मित्र श्री. रा. आनंदराव साक्रोजीराव सिंदे रविराव यांनी मला हें पत्र दिलें.

सदर्हू पत्र दि. ३० सप्टें. १७३७ रोजीं लिहिलेलें आहे. ह्या वेळेस बाजीरावाचा मुक्काम पुण्यास असावा. ह्या सालची बाजीरावची स्वारी भोपाळचीच होय. ह्या स्वारीकरतां बाजीराव कार्तिक शु. ३ शनिवारी प्रातःकाली सुमुहूर्ते निघाला (पेद २२।३६२). ह्या सालचा दसरा ७ आक्टो १७३७ रोजीं येतो. दसऱ्या नंतर अेकच आठवड्यानें ही स्वारी निघाली (१५ आक्टो ३७) आहे. अर्थात प्रस्तुत स्वारीकरितांच संताजी सिंद्यास हें पत्र लिहिलेलें असलें पाहिजे.

पे. द. भा. ४४ 'ऐतिहासीक घराणीं' ह्या भागांत दिलेल्या रविराव सिंद्यांच्या कैफियतींत ज्या मानाजीस बाळाजी विश्वनाथानें लोणी गांव इनाम दिला त्याचाच हा संताजी पुत्र असावा. या विधानास पूरक अशी अेक रविराव सिंद्यांची वंशावळही मला मिळाली आहे त्यावरून हें वाटतें. प्रस्तुत संताजी राक्षसभूवनच्या

लढाईंतही असण्याची शक्यता वाटते व तसें कैफियतींत म्हटलें आहे. परंतु अधीक विश्वनीय पुराव्याची जरूरी आहे.

ले. २८ असल } श्री { श. १६५९ आश्विन व. ३ इ. १७३७ सप्टें. ३०

राजश्री **संताजी रविराऊ** गोसावी यासीं

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य [मो. जागा] श्नो **बाजीराव बलाल** प्रधान आसीर्वाद सुा समानं सलासैन मया आलफ स्वारीची तयारी जाली आहे तरी तुम्ही आपल्या जमावानसी पत्रदर्शनी जलदीने येणे दिरंग न लावणे जाणिजे * छ १६ जमादिलाखर * बहुत काये लिहिणे श्री लेखन सीमा

(दोन ओळींची वर्तुली मुद्रा)

राजा शाहू नरप
ति हर्षनिधान बा
जीराव बलाळ
मुख्य प्रधा
न

* वेगवेगळ्या वळणाचें अक्षर. पा. स. ५।६८

---

# ३ राजापूर येथील मोगलांची धामधूम

(श्री. र. कृ. **पाटणकर**, राजापूर)

ले. २९ } { श. १६८४ आषाढ वद्य ८ इ. १७६२ जुल १४

श्री
शिवचरणीत
त्परमाहादाजी
रघुनाथ नी
रंतर

आज स्वारी राजश्री **माहादाजी रघुनाथ** सुभेदार प्रांत **जंजिरे विजयदुर्ग** ताहा सावकार उदमीयानी व पतकी डागी सेट्ये वगैरे वतनदारानी **बंदर कसबा राजापूर** सुा सलास सितैन मया व अलफ रा **नारो कृष्ण व गणेस कृष्ण** व **लक्ष्मण कृष्ण** व **सदाशिव कृष्ण** व **वासुदेव बलाल उपनाम मराठे** दलाल बंदर मजकूर याणे सुभा जंजिरे मजकूरचे मुकामी विदित केलें की आपलें मायआजे

**अंताजी राम केळकर दलाल बंदर राजापूर** हे बंदर मजकूरचें दलालीचें वतन चालवीत असतां पुढें कांहीं दिवसांनीं रमावलभदास संप्रदायें भगवद्भजनीं तत्पर होऊन श्रीदेव गोपालजीचें देवतार्चन अधिष्ठान ठाकुरद्वार संपादून श्रीची पूजा आर्चा नित्य नेम वार्षिक उछाह उत्तम प्रकारें चालवून आपलें सदरहू वतनहि चालवीत असतां **अंतोबा गोसावी** हे नांव प्रख्यात जाहालें त्याजवरी वार्धक्यकालीं त्यांणी आपली कन्या ते आमची मातुश्री **सुभद्राबाई** व आपले जावई आमचे तीर्थरूप **कृष्णाजी अनंत** या उभयतांस समीप राहून घेतलीं ते समई मातुश्रीनें गोसावी-यांची सेवा वर्ष सा महिने उतम प्रकारे निष्ठेने केली त्याजवरी अंतकालसमई आमचे तीर्थरूप मातुश्री यांस समीप बसवून चौघा ग्रहस्ताचे समक्ष निरवणूक केली जे आपले दोन पुत्र प्रौढ होते ते पहिलेच देवाज्ञा जाहाले आतां प्रौढ कोणीही नाहीं येक पुत्र लहान अशक्त पांच वर्षांचा आहे त्यास वतनाचें संरक्षण व श्रीठाकुरजीची पूजा अर्चा उछाहादिक चालोन आपला ही परिणाम उत्तम प्रकारें लागला पाहिजे यास्तव आमची कन्या हेच आपला पुत्र ऐसें म्हणोन आपलें दलालीचें वतन व देवतार्चन ठाकुरद्वार घरजागा आधि करून आमचे तीर्थरूप मातुश्री यांचे स्वाधीन करून दत करुन दिल्हे या विषयीं पत्रही लेहून दिल्हे होते व लाहान पुत्र होता तोही स्वाधीन करून हा मूल वांचला जगला तरी श्रीदेवतार्चनाचे आनुष्ठानांत प्रवीण करणें याप्रमाणें सांगितल्यावर गोसावी निधन पावले त्यांचे उत्तरकार्य आमचे तीर्थरूपानी केलें तदोतर पुढें वर्षसाहा महिने वतनाची आधिकरून वैवाट चालवीत असतां **मोगलाची धामधूम होऊन राजापूर उध्वस्त होउ लागलें** तेथे टिकाव न होये यास्तव ठाकुरद्वार देवतार्चन घेऊन विजयदुर्गास येऊन राहिलें त्यापासून वतनाचा भोगवटा राहिला आलीकडे **कान्होजी आगरे यांची** कारकीर्द जाहाली ते समई उपक्रम करावा तरी दरबार कठिण व आणखीही कितेक प्रकार प्रतिकूल होते याजकरितां तैसेच राहिले गोसावी याचा पुत्र होता तोही पुर्वीच कर्नाटक प्रांतीं रमावलभदास संप्रदाई गोसावी आले होते त्याणी अधिष्ठानाचे दर्शनास नेला तो तिकडेच देवाज्ञा जाहाला त्या उपरी या वतनाचा सनदपत्र करून यावा याकरतां **कुलाबेयास** जावयाचा उद्योग आपले तीर्थरूपानी करून **देशाई तपे राजापूर** याजकडे जाऊन सदरहू दलालीचे वतन **अंतोबा गोसावी** याणी आम्हांस दिल्हे आहे ते आम्ही चालविणार येविसी बखेर लेहून यावी ऐसे बोलिल्यावरी **निलबा ठाकूर देशाई व अनंतप्रभु मुतालिक देशाई पलसुले व सोभाजी देशकुलकर्णी** तपे मजकूर या त्रीवर्गानी वृध जुने सावकार वगैरे वतनदारांस येविसीची हकीकत पुसोन बखेर लेहून दिल्ही की बंदर राजापूर येथील दलालीचे वतन **अंतोबा गोसावी** यांणी देवतार्चन आदि करून आपले **कन्येस व जावई कृष्णाजी अनंत** अंतकालसमई दिल्हे याची वतनावरी स्थापना करावी ऐसी बखेर लेहून दिल्ही ते

सरकारची मोहीम जंजिरे मजकुरीं जाहाली ते समई सर्व वस्तुभाव पोथ्या पुस्तकें आदि करून गेलीं तेव्हां बखेर ही गेली त्याजवरी जजिरेमजकूर सरकारात आल्यावरी राजश्री **नारो त्रिंबक सुभेदार जंजिरा** आले ते समई वतनाचा उपक्रम केला तेच वेळेस रा **गोपाळ गणेश ऊर्फ बचंभट केळकर** येऊन मुजाहीम जाहले **नारो त्रिबक** यांणी त्यांच्या सागितल्याप्रमाणें त्याचें कार्यसिधीविसी हुजूर बखेर लेहून दिल्ही त्याजवरी आम्ही ही हुजूर जाऊन सर्व वृत्त श्रीमंत **राजश्री भाऊ-साहेबांस** निवेदन केल्यावरी तहकीकात करावयाची आज्ञा जाहाली त्यापासून सन इसने सितैन पावेतो तैसाच प्रकार राहिला असतां साल गुदस्तां सन इसने मध्यें **बचंभट केळकर** याणी आपला मनोदयच सरकारांत विदित करून वतनाची पत्रे करून घेतली आहेत येशास आमची हकीकत मनास आणून वतनाची आज्ञा करावी म्हणोन तपसिलें विनंति केली त्याजवरून **साल गुदस्तां** वतनाचीं पत्रें हुजुरून जाहालीं त्यासुधा **बचंभट केलकर** यांस सुभा आणिले त्यांचे व **नारो कृष्ण मराठे** या उभयताचे करीने कागद घेऊन मनसुभी करावी तों **बचंभट** व **पांडुरंग बलाल केलकर** याणी पूर्वापर विचारणा आपले जागा करून मूल पुरुषा-पासून वंशावलीचा निर्णय समजोन **मराठे** व **केलकर** समजाविसीचे प्रकारास मान्य होऊन **केलकर** यांणी स्वसंतोषे नारो कृष्ण आदिकरून **मराठे** यांसी पत्र लेहून दिल्हें की **कृष्णाजी अनंत** याजवळ गोसावी याचा पुत्र लहान होता तो पहिलाच कर्नाटक प्रांते जाऊन देवाज्ञा जाहाला गोसावी याणी आपले कन्येस पुत्र येसें म्हणोन जावई **कृष्णाजी अनत** यांस दलालीचें वतन व आधिष्ठान व घरजागा कसबा चेंदर यथील व **गुजरवाडी** मौजे **धोपेश्वर** येथील दत्त करून दिल्हें हें वृत्त खरेंच आहे यास्तव गोसावी याचा विभाग निमे **नारो कृष्ण मराठे** याजकडे चालवावा निमे **केलकरा**कडे चालवावा परंतु हाली समजाविसीचे प्रकारें करून वतनाचे तीन विभाग केले त्यापैकी येक तक्षीम **नारो कृष्ण** आर्धी करून **बंधु मराठे** यांजकडे व दोन तक्षीमा **गोपाळ गणेश व पांडुरंग बलाल केलकर** याजकडे याप्रमाणें करार होऊन **केलकरानी नारो कृष्ण मराठे** यांस पत्र लेहून दिल्हें तें सुभां हाजीर जालस राजश्री **नारोपंत देशमूख मामले दंडा राजपुरी** महालानिहाय हे तालुके मजकुराचे बंदोबस्तास हुजुरून आले त्यांचे विद्यमानें अवलोकन करून व **नील ठाकूर देशाई** व **बालाजी केशव देसाई** व **महादजी सोनदेव देशकुलकर्णी** वगैरे वतनदार यांस रुबरु आणून सत्य शुधीनें सांगणें म्हणोन आज्ञा केल्यावरी बोलिले जे पूर्वी **गोसावी** याणी आपलें दलालीचें वतन देवतार्चन व घरजागा आपले लेकीस दिल्हे याप्रमाणे जुने वृद्ध सावकार वगैरे वतनदार याणी साक्ष दिल्यावरून पेशजी **कान्होजी**

**आगरे** सरखेल यांस बखर लेहून दिल्ही येसे यजिनस **नील टाकूर देशाई** यांणी सर्वांचे साक्षीनी सांगितले व हालीं लेहूनहि दिल्हें याप्रकारें दाखले मोझे साक्ष पाहतां **अंतो गोसावी** याचा वतन विभाग **मराठे** याजकडे चालावा येसा निश्चय सर्वमत जाहाला त्याजवरून सदरहू दलालीचे वतन संबंधें हक व लवाजीम व पालकें व कानूकाइदा व घरजागा आदिकरून दोन तक्षीमा **केलकरांकडे** व यक तक्षीम **मराठे** याजकडे चालवावयाचा करार करून हें पत्र तुम्हांस सादर केलें असें जरी सदरहूप्रमाणें दोन तक्षीमा **गोपाल गणेश** व **पांडुरंग बलाल केतकरानी** चालवाव्या व तिसरी तक्षीम **नारो कृष्ण** आदिकरून बंधु मराठे हे व याचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने अनुभवितलि वतनसंबधे हक व लवाजीम व पालकें सिरस्ता हुजूरचे पत्राचामोजींचा बीतपसील सुदामतप्रमाणें—

कानुकाइदे कलमें

१ पैसारू माल हर बंदराहून त-
राडीं भरून येतात तो माल
फ्रोक होऊन विकरा येईल
त्यास दरसदे दलाली रुपये २
दोन प्रमाणें कदीम चालत आहे

१ स्वदशी सावकार व उदमी
हर बंदराहून माल जलमार्गे
घेऊन येतात तो फ्रोक
होऊन विकरा येईल त्यास
दर सदे दलाली रुपया १
यकप्रमाणें प्राो कदीम चालतें

१ माल हर जिनस माल
वाणी बंदराहून भरतील
त्यास दर खंडीस रुपये तीन
चवल प्रमाणें कदीम चालत आलें

१ मिठारावरून मीठ भरून बं-
दरास येऊन विकतें सिल-
क राहते त्यास दलाली खंडीस
रुपया ॥ निमपो चालत आले

———

४

पालकें

२ खुद घरें दोन परडें
झाडमाड
२ दुकाने दोन
१० बैल सर दाहा हरजिनस
घेऊन येता जातां त्या-
चा हासिल व महसूल
पालक चालत आलें
आहे
१० म्हैसा सर दाहा
२ चाकरांची घरे दोन

———

२६

येकून च्यार कलमें कानूबाबत व सवीस पालकें **केलकर** दोन तक्षीमा व **मराठे** येक तक्षीम विभागाप्रमाणें चालविणें वतन संबंधें हरकी हुजूर रुपये १६५० साडे सोलाशें सारकारांत येकंदर **गोपाल गणेश केलकर याणी** दिल्हे त्याचा त्रितीयांश मराठे याचे विभागाचे रुपये ५५० साडेपांचसें द्यावे ते **गोपाल गणेश** याजपाशी **मराठे** याणी दिल्हे त्याचा जाब **केलकरानी** मराठे यास दिल्हा व सुभा विदित केलें सदरहू खेरीज **नारो कृष्ण** आदिकरून बंधु मराठे यासी भोगवटेयास पत्रे करून दिल्हीं सबब नजर करार रुपये ५०० येकून पाचसे रुपये वसूल घेऊन हे पत्र सादर केले असे तरी मराटे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सदरहू वतनाचा विभागाप्रमाणें अनुभव करितील सदरहू तिसरी तक्षीमी **नारो कृष्ण** आदिकरून बंधु **मराठे** याजकडे चालवीत जाणें या पत्राची (प्रत) लेहून घेऊन असलपत्र भोगवटेयास परतोन मारानिल्हे याजकडे देणें बंदरमजकुरीं ··· तोड सुधामत प्रमाणें दलाल मजकूर याचे विद्यमाने करून सदरहू कराराप्रमाणें हक व लाजिमा कानुकादे मारीनल्हे यांकडे चालवीत जाणे जाणिजे छ २१ माहे जिल्हेज मोर्तुब सुद (मोर्तुब सुद)

( वाटोळा आकार )

---

# ४ बलवंतराव आपाजीचें जंजिरा प्रकरणीं पत्र

( श्री. ग. रा. वार्ळिबे )

ले. ३० नकल) श्री

फाइल नं. १९ क्रमांक १

सेवेसी **बलवंतराव आपाजी** कृतो ( ने ) क स्तिर सा। नमस्कार विज्ञापना ता। छ २८ जिल्काद पावेतो तालुक्याचे व बालकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष **माधवराव बेलोसे** वगैरे मोकासी भले लोक जंजिऱ्याची मसलत कबूल करून छतिसी बेरटींत येऊन नवे लोक ठेवितात दोन हजार पावेतों माणूस जमा केलें आहे दुसरेही ठेवणार आणि भेद केला आहे पांचसात मुसलमान यास कांहीं बक्षिसें कबूल करून जंजिरे यास रवाना केले आहेत याप्रो येथें वर्तमान आहे लोक ठेविले हे वर्तमान घेऊन मुजरद ग्रहस्त आला त्याणें सांगितले भेद कोणीकडून आहे हे पके समजले म्हणजे लिहीन राजश्री **मदनराव देरुणकर** याजकडील सिपाई बातमीस पाठविला होता त्याणेही वर्तमान याचप्रो सांगितले कळावे म्हणून लिहिलें आहे बहुत काय लिहिणें हो विज्ञापना

---

सदर पत्र डेक्कन कॉलेजांत असलेल्या पारसनवीस दप्तरांतील आहे. हें त्यांतलि दुसऱ्या इतर पत्रांप्रमाणें नाना फडणीस यांना लिहिलेलें आहे. तें सवाई माधवराव यांच्या कारकीर्दींतिल असावें.

पत्रांतील माहितीवरून भेद करून जंजिरा घ्यावा, असें हें कारस्थान दिसतें.

---

# ५ कुदळे व्यापाऱ्यांचें सिंहगड युद्धांत सहाय्य

**( श्री. शं. ना. वत्स जोशी )**

| ले. ३१ असल | श्री | श. १६३८ श्रावण वाा १३<br>इ. १७१६ आगष्ट ४ |
|---|---|---|

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवछरे श्रावण बहुळ त्रयोदसी मंद-वासरे क्षेत्रिये कुळावतंस श्री राजा **शाहू** छत्रपती स्वामी याणि राजश्री **शामजी हरी**

| श्री राजा शाहूछ त्रपती हर्षनीधा न बाळाजी वि श्वनाथ प्रधा न | श्री आई आदिपुरुषश्री राजा शाहुछत्रपति स्वामी कृपानिधित स्य परशराम त्र्यंब क प्रतिनीधि | नामजाद व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत **मावले** यासि आज्ञा केली ऐसी जे **रखमाजी** बिन **माव-जी कुदळा** बकाल वस्ती किले **सिंहगड** याणे साताराचे मुकामी हुजूर येऊन विनाति केली की |
|---|---|---|

आपण किले मारी बहुत दिवस दुकान घालून राहात आहे **औरंगजेब** पादशहा येऊन किल्यास वेढा घालून हस्तगत केला ते समई व **जुलफुकारखान** येऊन गड सिकिंदा जाला ते समई गलादाणा हर जिनस सामासुमा पुरविला गड गेला तेव्हा सर्वस्व आपहारहि जाला फिरोन गड गानिमा [ पा ] सून घेतला ते समई राजश्री **शंक-राजी पंडित सचीव** याचे जिल्हेमधे व गडाकडे सामान पुरविला ते कर्ज दिवाणात जमा आहे तो ऐवज हाली राजश्री **नारो पंडीत सचीव** यासि मागतां त्याणि जिल्हेमधे नरुत ऐवज न पावे म्हणून आपणास ताा **खेडेबारे** येथे पड जमीन पैकी एक चावर जमीन कुलबाब कुलकानु इनाम खेरीज हकदार करून दिल्ही आहे बितपसील

कसबे **खेडेबारें** ·।I· चावर मौजे **आरवी** ताा खेडेबारे ·।I· चावर

येकूण येक चावर जमीन इनाम दिल्ही आहे ते माहाराजे करार करून इनाम पत्रे दिल्ही पाहिजेत म्हणून विदित केले ते मनास आणून बकाल मजकुरानें किल्यास सामान पुरविला व सर्वस्व आपहार जाला आहे याचे चालवणे आगत्य जाणून राजश्री सचीवपती जमीन इनाम दिल्ही आहे त्याप्रमाणे हुजरून करार करून देऊन बकाल मारास

इनामपत्र व सनदा सादर केल्या आहेत तरी तुम्ही माइलेच्या सनद प्रो पडी जमनि पकी अवलदूमसीम प्रतीने बकाल मारास जमनि नेमून देऊन यास व पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणें प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहोन घेऊन असल पत्र भोगवटियास याजवली देणें लेखनालंकार*

मया
देयंरा
जते

*रुजु सुरु
निवीस

*सुरु सुद *बार

---

* हीं चार अक्षरें भिन्न. पा. स. ५१६८

---

ले. ३२ असल

{श. १६५२
{इ. १७३०

( प्रारंभीचा भाग फाटण्यांत गेला आहे. व त्यांत कांहीं मजकूर असावा—महजर-प्रारंभ व राजमुद्राधिकारी आणि कांहीं देशक यांचीं नावें त्यांत गेलीं असावीं. )

| देशमुख कोंडे | | देशकुलकर्णी नऱ्हेकर |
|---|---|---|
| मंडाजी बिन बाजी नाईक | पिराजी बिन नागोजी नाईक | [3]दा बालाजी रुद्र व पांडुरंग खंडेराऊ |
| [1]श्री बोपजीना ईक बीन क्षा पजी नाईक ( नांगरीचन्ह ) | [2]श्री नागोजीबी न कानजी देशमुख ( नांगराचें चिन्ह ) | बिाा रघुनाथ खंडेराऊ देशपांडे |
| बावाजी बिन रायाजी कोंडे (मोकळी जागा) | मंडाजी बिन बहिरजी कोंडे व बजाजी बिन सु-भानजी कोंडे ( मोकळी जागा ) | |

---

१ अष्टकोनी मुद्रा. २ वाटोळी मुद्रा. ३ हें अक्षर मागाहून पण तेव्हांच एकाच लेखकानें लिहिलें आहे.

| | |
|---|---|
| पिराजी बिन अनसोजी नावडकर कारभारी दिा देशमुख निा कटार (कट्यार चित्र) | रामजी नागनाथ बालाजी मल्हार खासनीस दिा देसमुख |

| | | | |
|---|---|---|---|
| मल्हारजी बिन सूर्यांजी डिमले सर पाटील मोकदम मौजे सिवरे (नांगर) | तावजी बिन तुळाजी चोरघे मोकदम मौजे राहाटवडे (नांगर) | मोराजी बिन गोमाजी गुजर मोकदम मौजे राजे (नांगर) | केरोजी बिन गोदजी नवघणे मौजे आरवी मोकदम (नांगर) |
| माळजी बिन माहादजी सुरवा मोकदम मौजे गाउडदरें (नांगर) | खंडोजी बिन लखमाजी भोर्डा मोकदम मौजे कासुर्डी (नांगर) | सटवोजी बिन नावजी मारणा मोकदम मौजे खोपी (नांगर) | मडाजी बिन बाजी कोंडे व पिराजी बिन नागोजी कोंडे मोकदम मौजे कुसगाव (नांगर) |
| दादजी बिन बावाजी कोंडे व सुलतान बिन येसवंत खान खुरोसी मोकदम कसबा खेड (नांगर) | सिदोजी बिन रघोजी पागारा मोकदम व सोनजी बिन गणोजी पागारा मौजे वेळू (नांगर) | चंदो सिवदेव पानसी कुलकर्णी मौजें सिवरे | रामाजी नागनाथ बापजी मल्हार कुलकर्णी कुसगांव |

कुलकर्णी नऱ्हेकर देशपांडे
देह २४ पैकी हाजीरी

| | |
|---|---|
| १ कसबा खेड | १ आरवी |
| १ राहाटवडे | १ गाउडदरे |
| १ रांजे | १ कासुर्डी |
| १ खोपी | १ वेळू |
| ४ | ४ |
| | १ पेठ सिवापूर |
| | ५ |

---

देह बिकलम
ऐ. सं. ७-५

| बालाजी रुद्र व पांडुरग खंडेराऊ देशपाडे निमे | | आपाजी रामचंद्र व मोरोबलाल देशपाडे निमे | |
|---|---|---|---|
| चादजी बिन मालजी चौधरी चौगुला मौजे आरवी | धोंडजी बिन हसाजी मोंगवला चौगुला मौजे गाउडदरे | बावाजी बिन माहादजी घीसरा चौगुला मौजे वेळू | सीव माली बिन माहाद माली सीवरकार चौगु-ला मौजे खोपी |
| १ | १ | १ | १ |

खूम कसबा खेड

| | | | |
|---|---|---|---|
| मल्हारजी बिन सभ-सेटी लांडगा माहाज-न नि॥ तागडी (तांगडी) | शामजी बिन गोदजी खेडकर सोनार पोत-दार नि॥ साडस (सांडस) | सिवजी बिन सताजी खोकला सिंपी जाम-दार नि॥ कातर (कात्री) | कोंडाजी बिन बरवा ठाकूर नि॥ कटार (कट्यार) |
| जुराजी बिन दा वलजी आवटी खुरासी नि॥ आधोली (अधोली) | जनाजी बिन से खजी सेख मेहऱ्या ताबोली नि॥ आटके (चक्र) | सुलजी बिन रा-याजी कासार मेहऱ्या नि॥ तुलई (तुळई) | नरसोजी बिन बालोजी सासवड-कर कासार मेह-ऱ्या नि॥ तुळई (तुळई) |
| संभाजी बिन हीर माळी जगथाप व माणकोजी बिन मु-ल माली यादव मेहेत्रे माळी नि॥ खुरपे (खुरपें) | मल्हारजी बिनबा लोजी माळवदकर जिनगर मेहऱ्या नि॥ करवत (करवत) | मकाजी बिन म-लजी चव्हाण तेली मेहऱ्या नि॥ पाहार (पाहार) | |
| सुतार व लोहार गाई-कवाड मेहत्रे | जोतिसी ता॥ मजकूर त्रिंबकभट लक्षुमण-बिन शंकर भटबिन भट ठकार केशवभट ठकार | गंगाजी बिन धुलोजी परीट मेहत्रे नि॥ मोगरी (मोगरी) | सटवा माहाला बिन नाग माहाला पिसाळ न्हावी मेहऱ्या नि॥ आरसा (आरसा) |
| फतेशा बिनबावाजी मुलाणा नी॥ सुरी (सुरी) | मावजी बिन संभाजी मेहऱ्या कुंभार खेडकर नि॥ चाक (चाक) | गोद मेहतर बिन तान मेहतर चाभा-र मेहऱ्या नि॥ रापी (रापी) | संताजी बिन राम जी गुरव नि॥ धुपारती (धुपारती) |

| | | |
|---|---|---|
| तान माळी बिन<br>होन माळी पुजारी | ठाणे नाईक<br>फता बिन<br>दावलजी नाईक-<br>वाडी काठी<br>(काठी) | <br>बावाजी बिन<br>राभांजी नाईक<br>वाडी<br>(काठी) |

१ हें नांव मूळ जें कांहीं लिहिलेलें होतें त्यावरच लिहिलेलें आहे. एक जी अधिक पडली आहे.

पेठ सिवापूर वगैरे

| | | | |
|---|---|---|---|
| मोरसेट बिन राम<br>सेटी देशमुख सेटे<br>निा तागडी<br>(तागडी) | कुसाजी बिन गोंद<br>सेटी सिवरेकर<br>माहाजन निा<br>तागडी<br>(तागडी) | पदाजी बिन<br>संताजी कोस्टी<br>मेहऱ्या निा<br>धोटे<br>(धोट) | बसापा बिन मोर<br>सेट कानडा कोस्टी<br>मेहऱ्या निा धोटे<br>(धोट) |
| माणकोजी बिन<br>सभसेटी लांडगा<br>सेट्या राजापूर<br>निा तागडी<br>(तागडी) | मल्हारजी बिन<br>सखाजी व गोपाळ-<br>जी बिन रामजी<br>पांचपोरे पानसारे<br>निा डांग<br>(डांग) | | |

माहार ताा मजकूर निा विलादोर

| | | | |
|---|---|---|---|
| यस नाक बिन<br>गोज नाक वाहवल<br>मेहऱ्या ताा मजकूर<br>व कसबा १ | देव नाक बिन<br>रुप नाक कावला<br>मौजे राहाटवडे<br>१ | बाल नाक बिन<br>राघ नाक कावला<br>मौजे आरवी<br>१ | खंड नाक बिन<br>नाग नाक वा-<br>हवल मौजे<br>रांजे<br>१ |
| भीक नाक बिन<br>सोन नाक वाहवाल<br>मौजे गाउडदरे<br>१ | हिवज नाक बिन<br>राज नाक खुटा<br>मौजे वेळु<br>१ | निब नाक बिन<br>माय नाक गायेक-<br>वाड मौजे कासुर्डी<br>१ | गरीबा बिन<br>राण नाक गाइ-<br>कवाड मौजे<br>कुसगाऊ<br>१ |

| | |
|---|---|
| बाप नाक बिन | माया बिन येस |
| काव नाक गायेक- | नाक राऊत मौजे |
| वाड मौजे सिवरे | खोपी |
| १ | १ |

सुहुर सन इहिदे सलासीन मंया आलफ यां वियमाने **रखमसेटी** व **रामसेटी** बिन **मालसेटी** [१]**कुलदे** सेटे कसबा **खेड** ता। खेडेंबारे यांसी लेहून दिल्हा गोत महजर अैसाजे तुम्ही गोतास विदित केले की आपण पेसजी किले **सिहगडी** दुकान बहुत दिवस घातले होते **मोगलाची धामधूम** जाली वेढें येऊन बैसले ते समई सर्व प्रकारें किलियास सामान पोहचाविला त्याचे हिसबू राजश्री **पंतसचीव** यांचे स्वारीकडे जमा आहेत व तांव्रास किला हस्तगत जाला तेव्हां आपली कुल बिशाद लुटली गेली स्वांरी जाली हे वर्तमान पेसजी राजश्री पंतसचीव स्वामींचे सेवेसी विदित केलें की आपण सर्व प्रकारें किली सिहगड येथील सामानांची उत्स (स्त) वारी केली **दोन वेढें** मोगलाचे किलियास पडिले किला मोगलांस दोन वेला हस्तगत जाला ते समई आपली सर्व बिशाद भरीस पडली किलियास सामाने पुरविली ते हिसेब व राजश्री पंतसचीव वैकुंठवासी याचे स्वारीकडे **संताजी घोरपडे** याचे खानगीस कर्ज दिल्हे व किरकोली जिनस दिल्हा व राजश्री **त्रिबक सिवदेव** मुतालीक दि॥ सुरूनिसी यांकडे ही उचापत दिल्ही तो अवघा हिसेब् दप्तरी आहे तो बयाज-वार मनांस आणून यैवज देविला पाहिजे म्हणून विनंती केली परंतु धामधुमेचा प्रसंग होता त्यांजकडून काही प्राप्त जालें नाही त्याणी कृपालू होऊन नूतन इनांम पड जमीन अवलदूम सीमच्याहारूम चौप्रतीची खेरीज हकदार व इनांमदार येक चावर दिल्ही योविसी माहाराज राजश्री स्वामींची पत्रें व राजश्री पंतसचीव याची पत्रें आहेत ते पाहोन गोत महजर करून दिल्हा पाहिजे म्हणून गोतास विदित केले त्याजवरून गोताने राजपत्रे व जिल्हेची पत्रें वाचून पाहिली वि॥ साल सन सबा

| | | |
|---|---|---|
| वृतीपत्र रखमसेटी | देशमूख व देश | रा॥ शामजी हरी सुभेदार |
| यास १ | पाडे ता॥ खेडेबारे १ | प्रां॥ मावले १ |
| किले सिहगड १ | मोकदम कसबा | मोकदम मौजे आरवी |
| | खेड १ | १ |

येणेंप्रमाणें पत्रें पाहिली तेव्हां निर्वाह कलला की तुम्हीं जबानी हकीकत सांगि-तली त्याप्रमाणें कागदपत्र आहेत तुम्ही राज्यांत श्रमसाहास केले स्वारी (ज) जालेस यामुळें माहाराज राजश्री स्वामी व राजश्री–पंत सचीव कृपालू होऊन तुम्हांस इनाम पड जमीन चौ प्रतीची खेरीज हकदार व इनामदार पाचा हाताचे काठीने विसा पांडाचा बिघा याप्रमाणें जमीन ता॥ खेडेबारे पैकी

---

१ 'कुदळे' पाहिजे.

कसबा खेड नीम चावर ·॥·          मौजे आरवी नीम चावर ·॥·

येकून येक चावर जमीन इनाम तुम्हांस दिल्ही येविसी दोही गावीच्या मोकदमांस पत्रें अलाहिदा आहेत व देशमूख व देशपाडे यांस पत्रे की चतुःसीमापूर्वक जमीन नेमून देऊन दुमाला करणें व गोतमहजर करून देणें त्याजवरून तुम्हांस पाचा हाताची काठी विसां पाडाचा बिघा याप्रमाणें चौ प्रतीची जमीन नेमून दिल्ही मोजणी बा माहाल सिरस्ता

कसबा खेड नीम चावर ·॥·          मौजे आरवी नीम चावर ·॥·

सदरहू प्रमाणे येक चावर जमीन दिल्ही आसे दिवाणपत्रे सन सबां दुर्मुख संवछरीची आहेत तेव्हां महजर जाला नाही तो सन मजकुरी करून दिल्हा असे तरी तुम्ही व तुमच्या पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने सदरहू येक चावर मोजणी माहाल-सिरस्ता प्रमाणें अनभऊन सुखरूप राहाणें पत्र वळी खेरीज तपसील येकूणसाठी हा चकनामा सही (अस्पष्ट) मरत बसुद*

---

देशमुख कोंडें दोघे, त्या दोघांच्याहि मुद्रा वेगवेगळ्या असून आकार व नांवें वेगळीं आहेत. नांवांत आडनांव कोरलेलें नाहीं मुद्रामध्यें नांगर हें चिन्ह कोरलेलें आहे. इतर दोन देशमूख कोंडे घराण्यांतीलच आहेत. पण त्यांपुढें देशमुखीच्या मुद्रा नाहीत व नांवांतहि नाईक ही पदवी लाविलेली नाहीं. पण देशमुख कोंडे ह्या शीर्षकाखालीं हीं नांवें असल्यामुळें कोंडे देशमूख घराण्यापैकींच हेहि दोघे असावे असें समजल्यास चालेल. ह्या दोघांच्या नांवांपुढें आणि मुद्रा उठविण्यासाठीं जागा मोकळी सोडली आहे देशमुखांचीं नांवें लिहिणें हें देशकुलकर्णी म्हणजे देशपांडे करीत.

देशमुखांचे पदरी खासनीस असत त्यांचीं दोन नांवें दिमत देशमूख म्हणून दिलीं आहेत व तेथेंच उजव्या अंगास दिंमत देशमूख म्हणून जें नांव दिलें आहे त्यांस कारभारी म्हणून संबोधिलें आहे व निशाणी कटार दिली आहे हें लक्ष्य आहे.

त्यापुढें सिवरे, राहाटवडे, रांजे, आरवी, गाउडदरे, कासुर्डी, खोपी, कुसगांव, खडे, वेळू, ह्या दहा गांवच्या मोकदमांचीं नांवें नांगराच्या खुणांसह लिहिलेलीं आहेत. हीं पाट-लांचीं नांवें कुलकर्णी लिहीत.

चौघां चौगुले मंडळींचीं नांवें चार गांवांचीच दिलीं आहेत.

---

*कागदास सहा जोड असून जोडावर दोन दोन मोरतब उठविलेले आहेत. प्रारंभीचा जो भाग फाटलेला आहे त्यांत किती जोड असलेले कागद गेले हें नेमकें कळण्यास मार्ग नाहीं. पण सामान्यतः एखादाच जोड म्हणजे दोनच कागद फाटण्यांत गेले असावेत.

ह्यानंतर खूम म्हणून व्यापारी मंडळीचीं नांवें दिलीं आहेत त्यांत माहाजन, सोनार, सिंपी, जामदार, ठाकूर, आवटी, तांबोली, कासार, माळी मेहत्रे, जिनगर, तेली, ह्या १० खुमांची नांवें दिलीं असून पुढें बलुतेदार दिलेले दिसतात. कारण सुतार लोहार, जोतिसी, परीट, माहाला, मुलाणा, कुंभार, चांभार, गुरव, माळी पुजारी, ह्यांचीं नांवें आलेलीं असून त्यांत १० जण आहेत. त्यानंतर पेठ सिवापूर येथील देशमूख सेटे, माहाजन, कोस्टी, सेटी व्यापारी आणि पानसारे ह्यांचीं नांवें सांगून शेवटीं वर उल्लेखिलेल्या १० गांवांतील महार मंडळींची नांवें दिलीं आहेत.

ह्या सर्व निरनिराळ्या धंद्यांच्या मंडळीच्या नांवांपुढें त्यांची धंद्याची निदर्शक निशाणी दिली आहे. व ती अधिक लक्ष्य आहे.

पानसारे— डांग, नाइकवाडी— काठी; तेली— पाहार, जिनगर— करवत

अवटी—आधोली, तांबोळी—अटके, कासार— तुलई

इतर व्यापारी उदमी मंडळीच्या निशाण्या परिचयाच्या आहेत.

सोनार पोतदार— सांडस, सिंपी जामदार— कात्री

ठाकूर— कटार, माळी— खुरपें

सुतार व लोहार काम करणारा एकच असल्यामुळें त्याची निशाणी दिली नाहीं.

न्हावी— आरसा, मुलाणा– सुरी, परीट— मोगरी, चांभार– रापी

कुंभार— चाक, गुरव– धुपारती, कोस्टी— धोटा

इतर कांहीं महजरांत निशाण्या देतांना त्यांच्या त्यांच्या धंद्याच्याच इतर हत्यारांकीं एखादें दिलेलें असतें उदा० चांभार— इंगा, येथें रापी आहे.

महार मंडळीचीं नांवें दहा आलीं आहेत व त्यांच्या नांवांच्या मथळ्यांतच विलादोर ही निशाणी लिहून सांगितली आहे. प्रत्येक महाराच्या नांवापुढें विलादोर असें लिहिलेंहि नाहीं आणि आकृतीहि दाखविलेली नाहीं.

ह्या कागदास महजर व चकनामा असेंहि म्हटलें आहे. आणि हा कागद मूळ इनामपत्रानंतर १४ वर्षांनीं झालेला आहे.

# ६ सखाराम बापू ( सखाराम हरी ? ) यास शफतपूर्वक बेलभंडार

( श्री. **कृष्णाजी वासुदेव पुरंदरे** )

हें पत्र मजजवळ कोठून आलें हें मला आता स्मरत नाहीं. हें अस्सल आहे. पत्राचा मायना लक्षपूर्वक पाहिल्यावर ते सुप्रसिद्ध मुत्सद्दी सखाराम बापू यास नसून दुसऱ्या कोणा 'सखाराम बापूस' आहे हें ध्यानांत येईल. पत्र लेखक पांच जण ब्राह्मण असून ते 'आशीर्वाद' लिहितात. यावरून ज्याला पत्र लिहिलें आहे तो ब्राह्मणेतर आहे यांत शंका नाहीं. याचा लेखन काल सवाई माधवरावांची कारकीर्द आणि प्रसंग हरीपंत फडक्याची राघोबावरील मोहीम हा आहे. लेखक पांचजण हरीपंतांच्या हाताखालचे दुय्यम सेनानी. ही सर्व परिस्थिती विचारांत घेऊन पत्र राघोबाचा पक्षपानी सखाराम हरी गुप्ते यास आहे. पण पत्रांत 'दादासाहेबाचे लक्ष सोडून रांवसाहेबाच्या आज्ञेप्रमाणें सेवा करावी. ज्यांत धणियाचे कल्याण ते गोष्ट करावी. लचांडांत सिरूं नये' असें आहे. पण पुढील घटना ध्यानांत घेतल्यास शफत, बेलभंडार फिरली हें खास.

ले. ३३ असल } श्री [1]शंकर {

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री **सखाराम बापू**
गोसावी यासी

स्नो। **कृष्णराव बलवत** व **आनंदराव गोपाल** व **सखाराम येसवंत** व **नरसिंगराव जनार्दन** व **नारो आनदराव** रुतानेक आसीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लेखन करावे विशेष आपणाकडून राजश्री **भास्करराव** आल त्याणी सविरतारे वर्तमान सागितले त्याजवरून राजश्री **हरीपत तात्या** यानी तुम्हाकडील यादी कलमाची करार करून दिल्ही आहे त्याजप्रमाण तुम्ही श्रीमत राजश्री **दादासाहेब** याचे. लक्ष सोडून श्रीमंत राजश्री **रावसाहेब** याच्या आज्ञेप्रमाणे सेवा करावी ज्यात धणियाचे कल्याण ती गोष्ट करावी राजकारण आगर हरयेक लचांडात सिरू नये या प्रां वर्तणूक करावी राजश्री. तात्यानी करार केल्या पमाण आम्ही पाचजण मिलून शेफतपूर्वक निभाऊन देऊ येविशई[1] मारनिले समागम बेलभडार पाठविला आसे सवशेय न धरावा रा छ १४ रावल बहुत काय लिहिणे[2] रूपा लोभ असो दीजे[3] हे विनंति

---

१ निराळे वळणाचा. २ निराळे वळणाचा. ३ या पुढील मजकूर कृष्णराव बलवंत ( आप्पा बळवंत ) यांच्या हातचा आहे.

# ७ थोरल्या माधवरावांचें अहल्याबाईस पत्र

( श्री. चिं. ग. कर्वे, बी. ए., पुणें )

[ यात माधवरावांचा कारभार कसा होता हें दिसून येईल. ]

ले. ३४ असल } श्री { श. १६९२ फा. शु. ४ सोम
इ. १७७१ फे. १८

[1]गंगाजन निर्मल **अहिल्याबाई होळकर** यांसी स्नो **माधवराव बलाल** प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष राजश्री **तुकोजी होलकर** याणीं रा। **गंगाधर येशवंत** यांचे वियमानें राजश्री **मोरो विनायेक** व **त्रिंबकराव सदाशिव** यांजकडून सरकारचे नजरेच्या भरण्यांचा यैवज देवविला त्याचा व्याजसुद्धां निकाल होये तों पावेतों पा। **चांदवड** येथील मामलतीची घालमेल करूं नये याप्रों करार असतां मारनिलेचा दरोबस्त येवज न दिल्हा आणि मामलत काढली त्यासही दोन सालें होत आलीं अद्याप रुपये दिल्हे नाहीं म्हणून विदित जाहालें यैशास सदरहू करारा प्रों सरकारचीं पत्रें मारनिले दीक्षित यांस दिल्हीं असें असता अवघा यैवज न दिल्हा आणि मामलत काडली हे गोष्टी उतम न केली हालीं हें पत्र लिहिलें असें तरी पेशजीच्या करारा प्रों रुपये दरोबस्त पावते करणें न केल्यास सरकारांतून बंदोबस्त करून घ्यावा लागेल हें समजोन पुन्हां बोभाट येविशींचा येकंदर न ये तें करणें *जाणिजे छ २ जिलकाद सुा इहिदे सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे आसीर्वाद (लेखन सीमा)

* अक्षर निराळें. पा. स. १७।६७

[1]दुसरें याच मजकुराचें पत्र सुा इसने सबैन मया व अलफ ( श. १६९३=इ. १७७१ ) चें आहे.

[–अज्ञातवासी संग्रह

---

# ८ चंद्रचूडास हिंदुस्थानचा येखत्यार

( श्री. मा. वि. गुजर, बी. ए., पुणें )

पेशवे दप्तर, पुणे येथील कागदपत्राचा अभ्यास करीत असतां सोबतचे पत्र माझें वाचण्यांत आलें. त्या पत्रांत श्रीमंत थोरले माधवराव पेशवे यानीं होळकरांचा दिवाण गंगाधर यशवंत चंद्रचूड यांस हिंदुस्थानचा येखत्यार दिला हा मुद्दा स्पष्ट केला आहे. त्याशिवाय मराठ्यांनीं जाटांचे मुलखांत ठाणीं बसविली हीहि हकीकत आहे.

ले. ३५ असल } श्री { श. १६८८ पौष शु. ९
{ इ. १७६७ डिसें. २९

श्रीमंत राजश्री [1]**रावसाहेब** स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक **नारो नीलकंठ** कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। पौष शुध ९ मंगळवार मु। **नासीक** स्वामीच्या कृपाकटाक्षे स्वस्त क्षेम असे विज्ञापना राजकी वर्तमान रा। **तुकोजी होलकर** यास वस्त्रे दिली रा। **महादजी शिंदे** याजलाहि सरदारीची वस्त्रे दिली रा। **बाजी नरसी** याणी पांच लाख रूपये तूर्त द्यावेसे करून सरकारातून दिवानगिरीची वस्त्रे घेतली आगोधर दिवानगिरीची श्रीमंत रा। **नानास** दिली उपरांत **बाजी नरसी** यास मुतालकीची वस्त्रे दिली रा। **अवचितराव** याची दिवानगिरी दूर केली तेहि आठाचव रोजा **पुण्या**स जाणार नानाची ममता त्याच्या ठाई आहे मुखत्यार मुतालकी श्रीमंतानी रा। **गंगाधरपंत तात्यास** सांगितली सिके कटार तात्याचे स्वाधीन केली हिंदुस्थानचा येखत्यार तात्या करतील ते प्रमाण **होलकर सिंदे पवार राजेबहादर त्रिंबकराव सिवदेव** व **सिवाजी विठ्ठल** सर्वांनीं तात्याचे तैनातीस राहून चाकरी करावी नानाही तैनात महासंकटे मान्य केली श्रीमंत सालमा।री छावणीस पुण्यातच राहिले येणेप्रा। पुण्याचे वर्तमान श्रीमंत रा। **दादासाहेब** समुद्रस्नानास गेले होते येक्रा दो रोजा आनंदवली येणार आहेत त्रिवर्ग मुत्सदीसह कराराचेच आश्रये हा कालवर चालत आहेत समुद्रस्नानास खासा मात्र गेले होते मुत्सद्दी येथेच होते रा। **गोपालराव गणेश** याणी उजरात वदलविली होती म्हणून पो। ( पेशजी ) त्यास लुटून घेतले होते हली तह होऊन श्रीमंत रा। **रावसाहेब** पुण्यास गेल्यानंतर त्याची पागा पुनः त्यास दिली तीन हती त्याचे घेतले ते दिले आणि बहुमान दोन यो। पाच हती च्यारसे घोडी देऊन आज्ञा केली कीं पुण्याकडे न जाणे दुसरे कोणीकडेहि पोट भरणे जे समई बोलाऊ तेव्हां येणे येैसे सांगितले दो चव रोजा कूच करून भोसल्याकडे जावयाचा मा।रनिलेचा इरादा आहे रा। **त्रिंबकराव नारायेण** आपले परवा पौष शुध ३ पुण्यास गेले **आनंदवली**च्या मुकामी श्रीमंताची भेट घेतली होती ते समई आज्ञा जाली कीं समागमे चला धंद्रावंदा सतत वाटे तो सरकारात जागाजुगा तूर्त नाहीं तिलातील तेल तिलात तुमची सोय केली जाईल ते समई याणी विनंती केली कीं घरचा बंदबस्त करून सेवेसी येतो त्याजवरून गेले आहेत **नानासी** सुती नाही ते वर्तमान पेशजी विनंती लिहिली होती बाकी शंभर रुपये त्याकरितां त्यासी पुण्यास जातेसमई खटखट केली परंतु निकाल न जाला त्याप्रांते **जाटाचे** दुंदीत आपण आपली जागा राखिली लहान साहन गढ्या त्याजकडे गेल्या होत्या त्या फौजेसह रा। **यादोराव हरी** पाठवून सोडऊन आपली ठाणी कायेम केली येणे-करून सरकारात तारिफ आपली होत आहे पेशजीहि **कऱ्हाऱ्यात** ते दम धरून

---

[1] विश्वासराव लक्ष्मण दाणी—राजेबहादर

ऐ. सं. ७–६

राहिले मर्द आहेत येैसे सर्वतो मुखे बोलतात रा **बालाजी सामराज** पूर्वीच येत होते परंतु तात्याचे सोबतीच्या प्रतीक्षेकरितां राहिले हली सेवेसी आले आहेत इकडील सर्वार्थ मुा निवेदन करितील **मोटचा** किला रा नानानी जाहगिरींत घेतला सरकारांतून यावयाची आज्ञा जाली सरकारचा खिजमतगार व नानाकडील **गणेशपंत** रा **मल्हारपंत** मामाचे फडणीस होते ते पंचवीस स्वार समागमे घेऊन येथे येणार तीन लाख रुपयांचे वसुलाचीहि ताकीद आहे ये। मामलतीत तंटे फार सोसणे प्राप्त जाले उपाये नाहीं जाटाचे दुंदीमुले मुलूक खराब स्वार सिबंदी जाजती ठेवणे आली सरकारांत रसद देणे इतके असोन **मोटचा** जाबसाल ये रीतीचा येैकून चित्त खिन्न जाले येथून मागती **गोविंदराव** यास लिहिले आहे हुजरा व ताकीद-पत्र मन:पूर्वक श्रीमंतानी दिले किंवा रदबदली मुले हा खुलासा काढून आंतरयामची मर्जी मागाहून लिहून पाठवू तेणेप्रमाणे द्यावयाचा जाला तर त्याजकडे आसला तरी आपलाच आहे तेहि त्या प्रांते येणार आखर आपणा खेरीज त्यास प्रिय पदार्थ दुसरा नाहीं मधे लबाडानी विपर्यास पाडला त्याजवर द्रिस्टी न द्यावी कार्याकारण मानापमान मनांत न आणावा तसेच याउपरी फौजा त्या प्रांते सत्वरच येतील सत्वर आल्या तरी चैत्र मास लागल आपले मामलतीचा बंदबस्त उतम राखावा वोझे आपणावर आहे **नाना** कृतांतपणे मामलेदारास वर्तवीत होते तरी अंतर करणार करीत होते येविसी बंदबस्त उतम केलाच असल येथे **नाना** बोलून दाखवितात कीं चवघे चहूंकडून खाऊन जातील आणि सरकारांत हिसेब कितेब कसा वारितील तेहि पाहू म्हणून स्मरणार्थ विनंती लिहिली आहे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

रा **वासुदेवपंत बापू** व रा **यादोराव भाऊ** व रा **गोपालपंत दाजी** स्वामीचे सेवेसी सा नमस्कार विनंती लिा पाहिजे लोभ कीजे हे विनंती

---

## ९ थो. माधवरावांचें परराष्ट्रीय धोरण

( **श्री. मा. वि. गुजर**, बी. ए , पुणें )

पा. स. ९१६३

ले. ३६ असल ) श्री {श. १६९१ पौष शुा ४ <br> {इ. १७७० डिसें २१

पुा राजश्री **रामचंद्र गणेश** व **विसाजी कृष्ण** स्वामी गोसावी यास

विनंती उपरी तुम्हास हिंदुस्थानचा येखतियार दिल्हा पंधरावीस हजार फौज हुजरातीची बरोबर व तोफखाना या निराळे राजश्री **कृष्णाजी पवार जिवाजी पवार** व राजश्री **त्रिंबकराव शिवदेव** व **शिवाजी विठल** राजश्री **सखाराम भगवंत** याचे पथक व **धोंडो दत्तात्रय** या खेरीज किरकोळ पथके व तुमचे दोन्ही बाजू **शिंदे होळकर** म्हणता कमपेश पन्नास हजार स्वारानिशी रा केले कां कीं

हिंदुस्थानात तीर्थरूप राजश्री **भाऊसाहेब** गेले त्या तागाईत सरकारची फौज गेली नाही तमाम अमीर राजेरजवाडे जाट यानी मुलूख आटोपून अति उन्नत जाले त्यास शिक्षा करून पैका मातबर घ्यावा सरकारचा मुलूख दाबिला असेल तो सोड-ऊन साबिक दस्तुर सरकारचा अमल करावा नक्ष लोकोत्तर करावा व दक्षिणी कायेम सारगरम आहेत ऐशी आवाई अबदाली व शीख वगैरे मुफसदावर गालब करावी यास्तव तुम्हास रा केले व तुमची उमेद नवी नवाजी केल्यास करून दाखवाल पैका मचलग मेळविण्यांत येईल व मुलूख सोडवाल तैसेच **शिंदे** व **होळ-कर** कृतकर्मे पराक्रमी होते जे कर्म धन्यानी करावे ते उभयतानी करावे करीत आलो आपले स्वहित न पाहाता सरकार उपयोगी कर्मे बहूत केली तेव्हाच या दौलतीचे बाजू म्हणवून घेतले होते ते तर आपले येकनिष्ठेत गेले त्यामागें त्यांचे वंशज **होळकर शिंदे** आहेत किंबहुना पहिल्यापेक्षाहि अधिक करून दाखवितील हा फार फार भरंवसा होता तुम्हास त्यास हिंदुस्थानास जाऊन वीस येकवीस महिने जाले कितीस्पद व धनी उपयोगी किती कर्मे संपादिलीत त्याचे मनन करावे **शिंदे उदेपुरास** गेले त्याचे मते आपणच कृतकार्य व्हावे यश आपण संपादावे **होळकराचे** मते शिंदे फजित पडावे वरकडाचेहि चित्ती खपीप व्हावे या भावे मामलतीस गुडघे बसोन मामलत खराब शिंदे खराब राज्यसंस्थान खराब सरकारांत रुपये दृष्टीस न पडे पन्नास लक्षाची मामलत केल्याचा लौकिक सरकारचे संस्थानी रुपाया नाहीं पाच लक्षाचा हवाला त्यांत दीड लक्षाचे जवाहीर पाठविले ते झक मारीत पडले कांहीं **शिंद्याही** जवाहीर पाठविले एवंच रुपयास जागा नाहीं **होळकर** कोट्यास गेले ते **शिंद्यास** असाह्य त्यांत त्यांचे इंगित येकूण परस्पर फूट येकाचे केले येकास अहंकृतीमुळे न माने तुम्ही उभयता मुखतार ते परस्पर भांडता बदलौकीक जाटाचा प्रकार म्हटले तर जाट अति गर्विष्ट जमीदार होत्साता बहुत अमर्यादा केली तद्योगे तो फजित पावला दैवगतीने तुम्हा सर्वांस यश केवळ तरतूद व येक्यतेने त्यास जरब दिल्ही म्हणावे तर ते गोष्ट न जाली तुम्ही सारे येकदिल असते तर जाट जिवंत कसा जाता **समरू** फिरंगी सभाळून कसा जाता (जाटाची) मोडली फौज मराट्याची मिठी लुटीची बैसिली असता ते कसे जाते जाठ भागी आपल्यास मोडणार नाही घरांत दुही या भावें **नजीबखानास** होळ-कराचे विद्यमाने आणिले **नजीबखान** येताच जाटास तुम्ही नतीजा दिल्हा तसेच तहरह खंडणी जबरदस्ती करिता तर जाली असती रुपये येणे झाडा होणे तो आजपर्यंत जालाच असता नजीबखान आले त्यांचे मतें आपण आल्यासारखे यांचे कांहीं तरी कार्य करून द्यावे या अर्थे त्यानी तुम्हास **अंतरवेदींत** उतरावयाची मसलत दिल्ही **शिंद्याचे** मारफतीने मामलत न व्हावी या मतें लांबणीवर पडले **शिंद्याचे** मतें हें काम आपले हातें न घेतले तेव्हा त्याचा कांहीं

गुड्घा असेलच जाटाची मामलत लांबणीवर पडली **नजीबखानाने** जाटाचे मुलखाची जप्ती करविली कितीक पैका तुम्ही जमा केला असाल तो तुम्ही लेहोन पाठवाल तेव्हां कळेल अखेर **नजीबखानानी** जाटाची मामलत आपलेकडे नेली तुम्ही **होळकर नजीबखानाचे** डेऱ्यास जाऊन मामलत चुकविलीत तुम्ही लढाई मारिली असता यश त्यास दिल्हे त्याणी केवढा लौकीक मेळविला बरे खंडणी केली तो तरी झाडून तुमच्या पदरी पैका पडला असता तर तें तऱ्ही कार्य जाहाले म्हणावयास जागा होता खंडणी पासष्ट लक्ष केली त्यांत घेता दहा तूर्त यावे दहात सात आले त्यासहि बटे तटे तीन परभारे **नजीबखानाने** बोढिले त्यास तुम्ही चौथाई द्यावयाची करार केली त्याणी घेतलीच असेल सारांश जाटाची मामलत दक्षिणेयास न होई ते आपण केली इतकेच येश त्याणी मेळविली **सुज्याअतदौला**कडील राजकारण **उमरावगीर** गोसावी याचे विद्यमाने आले त्याजशी तुम्ही बोलोन चालोन मतालिब लेहोन दिल्हे त्यांत **काशी प्रयागचा** मतलब लिहिला नाही तीर्थरूप कैलासवासी **नानासाहेबांता।** काशीप्रयागचा त्याजशीं बोलण्यात आहे तीर्थस्वरूप राजश्री **दादासाहेबानी** लेहूनच दिल्हे आहे ते तुम्हास ठावके असोन विस्मृतीखाले गेले ते लेहून यावे (व) करून घ्यावे वरकड तुम्ही मुदे लिहिले तें बरेच आहेत **गाजुदीखान** आले ते **रोहिल्याचा** मतलब बोलतात यंदाचे साल वीस लक्ष रुपये द्यावे त्यात दहा तूर्त सध्या दहा मुदतीने घ्यावे मुलूख दाबिला तो पेस्तर साली सोडून देतो म्हणोन लेहोन देतात व वजारत आपणास यावी दहा लक्ष सध्या घ्यावे पंधरा दिल्लीचा बंदोबस्त जाल्यावर घ्यावे म्हणून बोलतात म्हणोन परस्परे कळले ऐशास **नजीखबान** मृत्यु पावला मोठा हरामजादा फंदीफितीने फसाद हरामखोर होता लौकरच वारला मोठी व्याधी गेली राजकरणी होता तो जिवंत असता तर तुमचे राजकारण सिद्धिस जाऊ देता हे होणेच नव्हते प्रस्तुत त्याच्या घरात कलह लागला **मल्लखान कल्लखान** व **सुलतानखान** वगैरे येक होऊन जागे मकाने फौज खजीना आटोपून बळाऊन राहिले आहेत अनायसे केवढी गोष्ट जाहली आहे शत्रूचा निःपात व्हावा ऐसा समय प्राप्त जाहला आहे या वेळेस जे जे राजकारण द्रव्य व मुलूख साधणेविशी केल्यास सर्वहि घडावी असाच योग बनून आला आहे करणारानी मात्र मोठा साठ करून करावे सर्व सिद्धीस जाईल **नजीबखानाच्या** मरणामुळें दिल्लीचा बंदोबस्त तुटला असेल यास्तव तुम्ही रोहिल्याची मामलत पैक्यावर करावी पेस्तर साली मुलूक सोपून देतो ऐसे लेहून घेऊन मामलत चुकवावी दिल्लीचा बंदोबस्त **जाबतेखानानी** केला नाही तों तुम्ही दिल्लीस जावे दिल्ली हस्तगत करावी आपला बंदोबस्त करावा यंदाच रोहिल्यापासून मुलूख सोडवावयाची अड न धरावी दिल्लीत काबिजात जाल्यास वजारतची आरजु **सुज्याअतदौलास** आहे व पातशहास तक्तावर बसावे हे जरूर तेव्हां ते तुमचे मुदे मान्य करतील पैका देतील

व मुलूख देतील तुम्ही चार कलमे अधिक लेहून दिल्ही तरी करितील वजारत देतां सुज्याअतदौलयास द्यावी त्याचा सबळ पक्ष आहे फौज जमेत राखतो **गाजुदीखान** म्हणतात ते सिद्धिस जाणार नाहीसे वाटते सारांश **नजीबखानाचा** पक्ष **होळकरास** या हिशेचे ते हिसके मारतील होळकराचे कारभारी फितूर करतील पाय मोडून गोष्टी सांगतील त्या तुम्ही सर्वथा ऐकू नयेत तुम्ही व **शिंदे** सर्व एक व्हावे म्हणजे होळकर तुम्हास सोडितात ऐसे नाही **रोहिले बंगसास** आणून हे कार्य करावेच करावे म्हणजे **होळकर**हि न येऊन काय करतील येतील **नजीब-खान** बोलत होता अन्याय जाला तो माफ करावा यास पैका देतो व दाबला मुलुख सोडून देतो दहा हजारानी चाकरी करीन ऐसे त्याचे बोलणे होते ते तुम्ही करून घेऊन मग त्यास आणावे ते न केले अनायासे **नजीबखान** मेला तुम्ही **होळकरानी** क्रिया शफता दिल्यात तो मेला तेव्हां सर्व उगवले **जाबतेखाना-**पासून नजर व सदरहू करून घेऊन बहुमान करावा तो न केला **जाबतेखान** तुम्हांजवळ आहे त्यास दगा न करावा त्यास **नजीबगडास** पाऊन द्यावा आपले मुद्दे सर्व करून घ्यावे सुरळीत रीतीने वर्तिले तर उतम न वर्तेल तर पारपत्य करावे व मुख्य गोष्ट मनसुबियास तुम्ही फार फार चुकला येथून कितेक शिक्षापण लेहून पाठविले असता त्याप्रो॥ हि तुम्ही न केलेत धण्याची आज्ञा ईश्वरा तुल्य मानून त्या प्रो करावे आज्ञेहिपेक्षां सेवक लोकास धणी संतोषी विशेषात्कारे होय ऐसे सुचेल ते करावे अथवा न सुचे तर धण्याचे आज्ञेप्रो॥ तऱ्ही करावे ते तुम्हींच न केले प्रस्तुत **दिल्लीचे** कार्य निर्माण जाहले आहे हे गोष्ट कधी घडावयाची नाहीं ते सधी हली आली यासहि विलंब लावाल तर परिछिन्न कार्याचे नव्हे **नजीबखान** मरावा **दिल्ली** खाली पडावी सरकारची पनास हजार फौज **अंतरवेदीत** असावी हा योग कधी तरी बनावयाचा आहे तुम्ही उभयेतानी दीर्घ दृष्टीने विचार करावा धण्यानें इतके वाढविले असतां व फौजेप्रो॥ मोठे कार्य करून त्याखाली चुकी जाल्या त्या बरबात करून घ्यावे असा समय प्राप्त आहे तुम्ही करावे येणेकरून **सुज्याअत-दौला** व पातशाहा व रोहिले तुमची उपार्जना करतील कराराप्रमाणे जाट पैका देईल द्रव्यास व मुलुकास न्यून होणार नाहीं तुम्हास सर्व खोलून लिहिले आहे या उपरी न कराल तर ठीक नाही खुलासा सर्वांनी एक एकाचे न्यून पाहून पाहून घाण केली तैसे न करणें मातबर सरदारानीं सरकारचे लक्ष सोडून धणियाचे कामाची पायमली केली आपले वडिलाची रीत सोडून अमर्यादेस गोष्ट नेली यांत कल्याण नाहीं त्याही अशा गोष्टी सहसा नच कराव्या धण्याचे लक्ष धण्याचें हित तेच त्यानी करावे करून दाखवावे यांत उत्तम नक्ष लौकीक होईल धणी कृपाच करतील असो तुम्ही सर्व लिहिल्याअन्वयें समजोन करणें जाणीजे छ ३ र मजान बहुत काय लिहिणे हे विनंति

---

# १० पेशवे सरकारच्या दफ्तराची व्यवस्था व बाळाजीपंत नातू

( कै. द. वि. आपटे )

१* हे दोन कागद मंडईजवळील एका आताराजवळ मिळाले. पुडी गुंडाळण्यासाठीं तो ते फाडणार होता इतक्यांत एक पैसा देऊन मीं ते सोडवून घेतले.

२ या दोनही नकला आहेत. त्यांत पेशवे सरकारचें दफ्तर नाना फडणीसाचे वाड्यांत होतें, त्याची व्यवस्था पांच असामींकडे नेमून दिली व त्यांत ' बाळाजीपंत नातू हे प्रधान म्हणजे मुख्य अमानतदार' असें ठरविलें आहे. ही नेमणूक १८३५ सप्टेंबर ४ तारखेस गव्हर्नरकडून कौन्सिलच्या पत्रानुसार झाली आहे.

३ बाळाजीपंतांची गणना 'पुण्यांतील हुरमतीच्या माणसांत' केलेली आहे व ही नेमणूक केल्यानें त्याचे भूषण व लौकिक महाराष्ट्र लोकांमध्यें जाजती होतील व त्यांजकडे पेनशन वगैरे जे सरकारांतून चालतें हे दिकत ठेऊन त्यानी इतबारानें हे काम चालवावें 'अशी अपेक्षा गव्हर्नरांनीं व्यक्त केली आहे.

४ या कागदांत सांगितल्याप्रमाणें बाळाजीपंतांची नेमणूक पुणें दफ्तराच्या अमानतदारीच्या जागेवर झाली किंवा नाहीं ह्याचा शोध केला पाहिजे. पा. स. ९।३९

ले. ३७ } श्री { श. १७५७ भाद्र. व. ५<br>इ. १८३५ सप्टें. १२

नकल

साहेब मुजफक मेहेरबां दोस्ता बाळाजीपंत दादा नातु पुणें दफ्तरचे प्रधान अमानतदार व रामचंद्रपंत आबा ढमढेरे व नेटिव ज्यडज्य व दफ्तरदार निा रिविनियु कमिशनर व दफ्तरदार निा प्रेणसीपाल कलकटर सुभा पुणें पुणें दफ्तरचे अमानतदार सलामत

अजि द सौच अलेकसंडर बेल साहेब बहादुर यजंट जिल्हा दक्षण बादज सलाम खैरयत अज्याम अं की येथील खैर सला जाणून आपली षादमानी हमेषा कलमी करीत असिलें पाहिजे दरविला पेशवे सरकारचे दफ्तर नाना फडणीस यांचे वाड्यांत आहे. त्याचे वहिवाटीविसी व बंदोबस्ताविसीचे काम आपले कडेस सरकारांतून मेहेरबानगी करून मुकर [र] केले आहे व त्याचा रिवाज ठरून आला आहे त्याचा तरजामा आपलेकडे पाठविला आहे त्याजवरून मालूम होईले आपलेकडून इशारा येईल त्याप्रा दफ्तरचे कागदपत्र वाड्यासुा आपले हवाली केले जाईल त्याचे बंदोबस्त करून

कारकून वगैरे काय लागेल त्याची याद करून पाठवावी म्हणजे गौरनर कोसलास रवाना करून हुकूम आणविला जाईल व सदरहू काम चालवणेचे वहिवाटीविसी काही कायदा ठरवावयाचा असल्यास त्याची याद लिहून पाठवावी. तारीख १२ माहे सपटंबर सन १८३५ इा खुा सीत सलासीन मयातैन व अलफ ज्यादा काय लिहिणे त्यार कीजे हे कितावत

पौ ताा १६ सप्तंबर सन १८३५ इा. सही इंग्रजी बेल साहेब यांची

---

ले. ३८ } श्री { श. १७५८ श्रावण वद्य ९
इ. १८३६ सप्टं. ४

नकल

गौरनर कोसलचे पत्र ताा ४ माहे सपटंबर सन १८३६ इसवीस नंबर १०४१ चे यजंट साहेब यांचे नावे आले त्याचा तरजमा

१ माजी यजंट साहेब याचे पत्र ताा ४ जून सन १८३५ इसवीचे पत्र पेशवे सरकारचे दफ्तरचे कागद याची चांगली बरदास्त राखण्याविसी तजवीज ते पावले.

२ त्याचा जबाब लिहिला जातो जे हाली जो बंदोबस्त राखणे व दफ्तरांत कागद आहेत त्याची दुरुस्ती ठेवणे व त्यांतून दाखले वगैरे देणेविसीचा वगैरे बंदोबस्त करणें जरूर आहे असे सरकारचे मनात आहे.

३ याकरितां गौरनर कोसल याणी ठरविले आहे जे दफ्तरची वहिवाट मोठी हुरमतीची माणसे पुण्यांत राहाणारे याजकडेस सांगावी व त्याची जबाबदारी खाली बंदोबस्त लिहिला आहे त्याप्रमाणें याजकडेसच राहील व त्याप्रमाणें तुम्ही बंदोबस्त राखावा.

४ सरकारांतून मेहेरबानी करून जे लोक या कामाकरितां नेमिले पाहिजेत त्याची नावनिसी

१ बाळाजीपंत नातू
१ रामचंद्र पांडुरंग ढमढेरे
१ नेटिव ज्यडज्य
१ दफ्तरदार निाा रिविनियु कमिशनर
१ दफ्तरदार निाा प्रेणसिपाल कलकटर सुभा पुणे

सदरहू पांच आसामीस पुणे दप्तरचे [1]अमानतदार असे म्हणावे त्यांत बाळाजीपंत नातू हे मुख्य अमानतदार याकरितां त्यास प्रधान असे म्हणावे

५ सदरहु प्रों या लोकाची नेमणूक केल्याकडून त्याचे भूषण व लौकिक माहाराष्ट्र लोकामध्ये जाजती होईल तेणेकरून त्याचा संतोष होईल व गौरनर कोसल ध्याहात आहे कीं ही हुर्मत त्यास दिल्याने व त्याजकडे पनसील वगैरे जे सरकारांतून चालते हे दिलांत ठेऊन इतबाराने हे काम चालवावे

६ अमानतदार याणी आपले खातरजमेचे दोन कारकून येक पनास रुा व येक वीस रुपये दरमाहाचा ठेवावा

७ यज्यंट कचेरींचे अथवा ज्यडज्य व सेशन ज्यडज्य यांजकडील कारकून याचा व दप्फरचा समंध बिलकुल राहिला नाही व यजंट कचेरीकडील कारकून हाली जे दप्फरांत असतील त्याची यजंट कचेरीत गरज नसल्यास बर्तर्फ करावे

८ गौरनर कोसलातून आपल्यास लिहिले जाते जे सरकारचे व अमानतदार यांचे दरम्यान तुम्हास मुकर (र) केले असे याजकरितां तुम्ही अमानतदार याची हरवख्त कुमक करीत असावी व या प्रमाणेच प्रेणसीपल कलकटर सुभा पुणे याणी चालावे त्याजकडे या यादीची नकल पाठविली असे दप्फरची किली मुख्य अमान[त]तदार यांजकडे राहावी व ज्या समई उघडावयाचे प्रयोजन लागेल तेव्हा एकाहून जाजती अमानतदार नेहेमी हजर असावे

१० अमानतदार याणी प्रथमं दप्फरांत कागद आहेत त्याचे फेरिस्त हिंदवी लिपीत ल्याहावे

११ येक सिक्का पुणे दफ्तर या नांवाचा तयार करून आमानतदार याजकडे पाठविला जाईल व गौरनर कोसलातून फरमाविले जाते जे दाहावे कलमात फेरिस्त लिहिले आहे ते व दुसरे सर्व कागद दफ्तरात आहेत ते छापवावे म्हणजे दुसरा कागद त्यात दाखल होऊ स[क]णार नाही

१२ कागद छापवावयाचे काम दोन अमानतदार याचे समक्ष व्हावे व त्याणी ज्या दिवसी ज्या वेळेस त्यांचे सोईस पडेल तेव्हा त्याणी हजर राहावे व छापण्याचे कामाकरितां हंगामी कारकून जितके लागतील तितके तुमचे विद्यमाने पूर्वी हुकूम घेऊन ठेवावे

१३ दाखलेची नक्कल घेण्याविसी अर्ज्या प्रथम तुम्हाकडे क. ×× मंजूर केल्यावर अमानतदार याजकडे याद पाठवावी की दाखलेच्या नकला घ्याव्या हे काम दोनी अमानतदार यांचे समक्ष करावे व दाखल्याचे नकलेवर सही कर्णे ती येकाने करावी

१४ अमानतदार याणी वहिवाट कर्ण्याचा रिवाज तुम्ही ठराऊन द्यावा[2] व त्याणा

दत्फरांत दुसरा कागद दाखल जाला ऐसा त्यास वहीम आलियास त्याणी तुम्हास जाहीर करावे व गोरनर कोसलांतून आपल्यास कलमी केले जाते जे दत्फरचे लोकांखेरीज दुसरे कोणी कागद पाहू नये व दुसरे कोणी [3]दत्फरांत जाऊ नये असा कायदा मुकरर करावा सई इंग्रजी यज्यंट साहेबाची.

१ मुळांत 'आमातनदार' असें चुकीनें पडलें आहे. २ वा मुळांत अधिक पडला आहे. तो हस्तदोष होय. ३ सर्वत्र दत्फर असेंच लिहिलें गेलें आहे.

---

# ११ सखुबाई शिंदे यांची मृत्युतिथी

( श्री. शं. ना. जोशी, पुणें )

सनदा असल आहेत. व त्यांचे काल इ. स. १७९१ अक्टो. ११ व १७९४ मार्च ३० असे आहेत. पहिली सनद सखूबाई शिंदे यांनी दिलेली आहे व दुसरी दौलतराव शिंदे यांनी दिलेली आहे. १७९४ च्या सनदेंत कैलासवासी मातुश्री सखुबाई शिंदे असें स्पष्ट म्हटलें असल्यामुळें इ. १७९१ च्या नंतर व १७९४ च्या पूर्वीं ही सखुबाई मृत्यु पावली असली पाहिजे एवढेंच निश्चित. आतांपर्यंत ह्या सखुबाईच्या मत्यूच्या कालासंबंधी इतकाहि निर्देश आलेला नव्हता.

सखूबाई शिंदे ही नागोरच्या वेढ्यांत मृत्यु पावलेल्या जयापा शिंदे यांची पत्नी. ह्या सखुबाई शिंदे यांजविषयीं एक पोवाडाहि प्रसिद्ध आहे. स्वतः सखुबाईची कांहीं पत्रें व त्यांचंविषयीं उल्लेख असलेलीं पत्रें, महादजी शिंदे व शिंदे बायां यांचें भांडणांत बरींच आलीं आहेत. वर म्हटलेंच आहे कीं, ह्या सखुबाईच्या मृत्यूविषयीं नेमका व पुरता उल्लेख आजवर कोठेंच नाहीं. पण पोवाड्यांत 'पुष वद्य होती तीळसंक्रांत । दिशा धुंद केल्या समस्त । तुटला तारा दोपारच्या अमलात । अचंबा करिती जन बहुत । उगवला दिन गुरुवार चहुथ । गेली निजधामा सकुबाई श्रीमंत । एकच झाला एकांत । रोजना करिती दादीबाई । म्हणे देवा झाले काई ॥ इ.[ ऐ. पो. भा. २ य. न. केळकर ] असें अंतकालचें वर्णन व दिवस महिना व वेळ ह्यासह दिलें आहे. पण तेथें वर्ष सांगितलें नाहीं. ह्यामुळें पौष वद्य ४ ही मिती मिळूनहि वर्ष मिळालें नसल्यामुळें काहीं उपयोग नव्हता. आतां ह्या पत्रानें वर्ष काढतां येतें. १७९१ च्या आश्विनांत चंद्रग्रहणाला सकुबाईनें भूमिदान केलें व त्याचें दानपत्र सिद्ध होऊन बार झालें पौष शु. ९ म्ह. १७९२ जाने. २ ला आणि १७९४ त सकुबाई ह्या कैलासवासी म्हणून उल्लेख दौलतराव शिंदे करतात. अर्थात १७९२ ते १७९४ वर्षी पोवाड्यातलि मिती जमेल ती मिती सखुबाईच्या मृत्यूची समजण्यास प्रत्यवाय नाहीं. ही मिती व हा महणाचा

योग शक १७१३ मध्यें बरोबर आहे. म्हणून पोंवाडा, आजचीं हीं दोन पत्रें ह्या-वरून श. १७१३ पौष व. ४ गुरुवार म्ह. १७९२ जाने. १२ ही सखुबाईची मृत्यूतिथी निश्चितपणें समजण्यास हरकत नाहीं.

आजचें दानपत्र व भोगवटापत्र हीं दोन पत्रें अगदीं मामुलींच असलीं तरी त्यांतील सखुबाईच्या उल्लेखावरून पोवाड्याच्या आधारें मृत्यूतिथी ठरविण्यास उप-योगी असल्यामुळें महत्वाचीं व विवेचनार्ह आहेत.

पत्रांत ज्यांना सकूबाईनें दान दिलें तें बालाचार्य हे मुधोळचे, असें सनदेंत सांगि-तलें आहे. सनदा देणारे श्री. श्रीनिवास तमणाचार्य कट्टी, (शिक्षक, जिवाजीराव हायस्कूल ग्वालेर) हे ह्यासंबंधांत सांगतात कीं, सखुबाईची एक मुलगी मुधोळकर घोरपडे गोविंदराव यांस दिली होती. ह्या मुलीकडे पोथीपुराण सांगण्यासाठीं बाळा-च्यार्यांची नेमणूक होती. मुधोळकर घोरपडे इतिहासांत गोविंदराव दोन दर्शित आहेत. एक १७०० इसवींत वारले ते व दुसरे बापू गोखल्यांबरोबर अष्टे लढाईत इ. स. १८१८ मध्यें धारातीर्थीं पडले ते; पैकीं १८१८ मधील गोविंदरावांसच जयापाच्या पांच मुलींपैकीं अहिल्याबाई ही ५ वी मुलगी दिली होती· ह्या मुलीच्या सांगण्यावरून तिच्या पुराणिकास, श्रीगोंदे हा जो सखुबाईचा खासगी इनामी गांव त्या गांवांतील एक चाहूर जमीन दिली आहे. सखुबाईचें महादजी शिंदे, अहल्याबाई होळकर यांच्याशीं तंटे झाल्याचींहि पत्रें आहेत. सखुबाईस एक लक्षाच्यावर पेशव्यांचेकडून खर्चाची व्यवस्था होती. त्यांतच श्रीगोंदे हा गांव होता. म्हणून सखुबाईनें तेथील १ चाहूर जमीन दिली.

ह्या सखुबाईच्या पत्राचा विशेष हा एक लक्ष्यांत घेण्याजोगा आहे कीं, ही आपल्या मुलाचा शिक्का वापरते.

येथेंच ही गोष्ट सखुबाई संबंधाच्याच उल्लेखांची असल्यामुळें सांगणें भाग आहे कीं म. रि. उ. विभाग पृ. ३९२ वर जयापाची मुलगी व पत्नी लक्ष्मीबाई व सख-बाई असें नजर चुकीनें पडलें आहे. सखुबाई ही खैमसावत यांस दिली हेंहि लिहिलें गेलें आहे. तेंहि दुरुस्त करावयास पाहिजे. असो. पत्रें अशीं—

| ले. ३९ असल | श्री | श. १७१५ फाल्गुन व. १४<br>इ. १७९४ मार्च ३० |
|---|---|---|

राजश्री बालाजी जनार्दन गोसावी यांसी

द. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य ——— श्री दौलतराव सिंदे दंडवत सा। आर्बा तिसैन मया व आलफ वेदमूर्ती बालाच्यार्ये बिन भीमाच्यार्ये वैष्णव **गोत्र सांख्यायन सूत्र आश्वलायन याणी विदित केल की आमचे तीर्थरूप भीमाच्यार्ये**

यासी कैलासवासी मातुश्री सखुबाई सिंदे यांणी धर्मादाय वर्षासन सालिना तीनसे रुा प्रमाण करून देऊन चालविले त्याजबा। पावत आले अैसियास आपण कृपालू होऊन भोगवटीयास सनद करून देऊन धर्मादाय चालविला पाहिजे म्हणोन त्याजवरून मनास आणिता वेदमूर्ती बाईच्या संग्रही बहुत दिवस राहिले याचे चालवणे आगत्य जाणून यासी वर्षासन तीनसे रुा पावत होते त्यापो वर्षासन सालिना कसबे श्रीगोंदे येथील अैवजी ——— रुाये १५०

येकून दीडसे रुा प्रमाणे वर्षासन सालिना (पत्राच्या पाठीमागे) 'सरकारातून करार करून दिल्हे असे तरी सदरहू कसबे मजकूरचे अैवजी वर्षासन सालिना दीडसे रुा प्रो साल (दरसाल) पाववीत जाणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करिता या सनदेची प्रती घेऊन आसल सनद भोगवटियास परतोन*देणे*जागीजे छ २७ माहे साबान*बहुत काय लिहिणे हे*विनंती (मोर्तब सुद)

---

ले. ४० असल } { श. १७१३ आश्वीन शु. १५<br>इ. १७९१ आक्टों. ११

श्री

वाो राजश्री बाळाच्यार्य बिन भीमाच्चार्य उपनाम हिवरकर गोत्र सांख्यायेन सूत्र आश्वलायेन वास्तव्य मुधोळ गोसावी यास

श्राो सकूबाई सिंदे दंडवत विनंती उपर दानपत्र सके १७१३ विरोधकृत नाम सवंछरे आश्वीन सुध १५ पौर्णिमा चंद्रग्रहण पर्वकाळ ते दिवसी ब्राह्मणाप्रति भूमीदान केलिया पुण्य विशष जाणोन कसबे श्रीगोंदे हा गाव आपला खाजगी इनामी येथील काळीपौ जमीन चाहूर १ येक येकूण बिघे १२० येकंसेवीस येथील जळत-रुत्रण काष्ट पाषाण निधिनिक्षप आदि करून दिवाणचा सारा हलीपटी व पेस्तरपटी सुधा खेरीज हकदार वजा करून इनाम तुम्हास करार करून दिल्हा असे सदरहु ज-मिनीत जिराईत बागाईत उत्पन्न करून तुम्ही आपले पुत्रपौत्रादी वशपरंपरेण आन-भवोन भोगवटा घेत जाणे सदरहू इनाम तुम्हाकडेस आम्ही व आमचे वंशीचे चाल [वि] तील यद्‌र्थी धर्मशास्त्र श्लोक स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच वसुंधरां ८ षष्ठी वर्षसहस्राणी विष्टायां जायते क्रिमी ॥ "ता छ ७ माहे जाावल सुा इसने तिसैन मया व आलफ सन १२०१ बहुत काय लिहिण हे विनंती मोर्तब सुद (= पौश शु ९ = १७९२ जाने. २)

---

*तिन्ही अक्षरें भिन्न. १ श्री जोतिस्वरूपच रणीतत्पर राणो जीसुत महादजी शिंदे निरंतर' असा चार ओळींचा व तीन वलयें असलेला वाटोळा शिक्का पत्राच्या पाठी-वर प्रारंभींच डाव्या हातास आहे.

पत्राची पाठीमागील बाजू. येथें डाव्या हातास पांच ओळींची कोयरी किंवा पिंपळपानी आकाराची मुद्रा आहे. १ श्री जोति २ स्वरूपचरणित ३ त्परजयाजीसुत ४ जनकोजी सींदे ५ निरंतर

येथून बालबोधींत श्लोक लिहिला आहे. १, २ हीं दोन्ही अक्षरें भिन्न * ही बार केल्याची तारीख आहे. आकड्यांत सांगितलेलें वर्ष फसली आहे.

---

# १२ पुरंदरेदप्तर, पहिला भाग—तारखांची दुरुस्ती

(श्री. ग. ह. खरे, भा. इ. सं. मंडळ, पुणें)

हिंगणे संग्रहांतील कागदपत्रांचा अभ्यास करीत असतां अनेक वेळां पुरंदरे दफ्तर पहिला भाग हें पुस्तक चाळावें लागलें. हिंगणे दिल्ली, जयपूर, लखनौ इत्यादि ठिकाणीं वकीलीचें काम करीत असल्यानें त्यांजकडील कागद मुख्यतः मराठ्यांच्या उत्तरेंतील हालचाली विशद करणारे असावे हें साहजिक आहे. पण त्यांनीं किंवा पेशवे व त्यांचे सरदार यांनीं एकमेकांस लिहिलेल्या पत्रांत फक्त उत्तरेंतील राजकारणच लिहिलें पाहिजे असें बंधन नसल्यामुळें त्यांत दक्षिणेंतील राजकारणाचेही संदर्भ येतात. प्रधानतः याचमुळें मला वारंवार पुरंदरे दफ्तर पहिला भाग अवलोकावा लागला. त्यांतल्या त्यांत ले. १४१ पासून पुढचीं पत्रें मीं विशेष बारकाईनें वाचलीं तेव्हां मला असें आढळलें कीं, त्यांपैकीं सुमारें सत्तर पत्रांना नवीन तारखा दिल्या पाहिजेत.

या पत्रांपैकीं ९ पत्रांचे काल श्री. पुरंदरे यांनीं आजिबात दिले नाहींत. ११ पत्रांच्या तारखा जंत्रीवरून उतरत असतां नजरचूक तरी झाली आहे किंवा कांहीं ठिकाणीं मोडक जंत्री तर कांहीं ठिकाणीं पिल्ले जंत्री पाहिल्यानें घोटाळा उत्पन्न झाला आहे. बाकीच्या पत्रांस दिलेल्या तारखा संदर्भ जुळविण्यांत फरक पडल्यामुळें चुकल्या आहेत.

ही प्रत्येक तारीख कां व कशी बदलावयास पाहिजे हें विस्तारानें दाखवावयाचें म्हटलें तर त्यास बरींच पृष्ठें खर्चीं घालावीं लागतील. तसें करण्यात आज सवड नाहीं; म्हणून येथें प्रत्येक गटांतील कांहीं तारखा घेऊन त्यांचें विवेचन करतों व नंतर त्या गटांतील दुरुस्त तारखा देतों.

## नवीन तारखा

ले. ३७४ या पत्रास श्री. पुरंदरे यांनीं तारीख दिलेली नाहीं. यांत आलेल्या प्रसंगांपैकीं ज्याची तारीख आपणास सहज ठरवितां येईल तो म्हणजे सुरतेसंबंधीं, कृष्णाजीपंत, आपन (हा शब्द बरोबर लागला नाहीं अशी श्री. पुरंदरे यांनीं टीप दिली

आहे. या प्रकरणांत 'मिया आछन'चा निर्देश येतो. तेव्हां येथें आछन असावयास पाहिजे) अली नवाझखान यांच्या संघर्षणाचा प्रसंग होय. हा इ. १७५८ च्या अखेरीस व इ. १७५९ च्या प्रारंभीं घडला हें सुरत गॅझेटियरवरून सहज ध्यानांत येतें (पृ. १२५). 'काव्येतिहाससंग्रह पत्रें यादी वगैरे' ले. १७९ (जुना लेखांक ९६) मध्यें हाच विषय आला आहे. तेव्हां प्रस्तुत पत्राची तारीख या धोरणानें बसविली पाहिजे. मूळ पत्रांत फक्त रखर १३ येवढा निर्देश आहे. श. १६८० मार्गशीर्ष शुद्ध १५ = इ. १७५८ डिसेंबर १५ या दिवशीं रखर १३ पडत असल्यानें हीच या पत्राची निश्चित तारीख होते. यास आणखी पुरावा ऐसंसा खंड ३ ले. २८० ते २८५ यांत मिळतो. तेथील पत्रांत या प्रसंगाची पूर्ण तारीख आली आहे. 'काव्येतिहाससंग्रह पत्रें, यादी वगैरे' च्या श्री. गो. स. सरदेसाई इत्यादि संपादित नवीन आवृत्तींत ले. १७९ ची तारीख श. १६८१ मार्गशीर्ष वद्य ३=इ. १७५९ नोव्हेंबर ७ अशी दिली आहे ती इ. १६८० मार्गशीर्ष वद्य ३=इ. १७५८ डिसेंबर १८ अशी पाहिजे हें वरील संदर्भ, पत्रांत आलेली 'छ १४ (१२ नव्हे; मूळ आवृत्तींत १४ आहे) रबिलाव(ख)र, १६ रबिलाव(ख)र' हे कालनिर्देश व संपादकांनीं टीपेंत केलेला उल्लेख (बाळाजी बाजीराव रोजनिशी भाग १, ले. ९८) यांवरून उत्तम प्रकारें सिद्ध होतें. आपण जो पुरावा पुढें करतों त्यावरूनच आपण ठरविलेली तारीख चूक ठरते हें श्री. सरदेसाई प्रभृतींच्या कां लक्षांत आलें नाहीं ? 'काव्येतिहाससंग्रह पत्रें यादी वगैरे' ले. १७९ मधील विषयच शिंदेशाही इतिहासाचीं साधनें खंड ३, ले. ९१ मध्यें आला आहे. या लेखांत जखर ७ येवढी तारीख आहे. संपादकांनीं टीपेंत पेद ४० ले. १०९, ११० हे पाहिले असें नमूद केलें आहे. तेव्हां त्यांच्या तारखाही त्यांनीं पाहिल्या असतील. मग येथें १६ फरवरी १७५८ ही तारीख कशी दिली ? येथें श. १६८० माघ शुद्ध १० = इ. १७५९ फेब्रुवारी ६ अशी तारीख पाहिजे. असो. अशा तऱ्हेनें पुढें दिलेल्या इतर कालांचीही चर्चा करतां येईल. पण विस्तारभयास्तव आखडतें घेतों. नवीन तारखा येणेंप्रमाणें—

| पत्र क्रमांक | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | खिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| १५१ | पौ सवाल १४ | श. १६७० आश्विन शु. १५ | इ. १७४८ सप्टें. २७ |
| १६१ | पौष शु. ६ बुध. | श १६६७<br>श. १६७० | इ. १७४५ डिसेंबर १८<br>इ. १७४८ डिसेंबर १४ |
| १७० | — | श. १६७० आषाढ वद्य १० नंतर | इ. १७४८ जुलै ९ नंतर |
| १८९ | — | श. १६७० आषाढ व. १०—श्रावण व. ४ | इ. १७४८ जुलै ९-आगस्ट १ |
| २०७ | साबान २६ | श. १६७२ आषाढ व. १३ | इ. १७५० जुलै २० |
| २०९ | — | श. १६७२ | इ. १७५०—५१ |
| ३६६ | — | श. १६७५ ज्येष्ठ | इ. १७५३ जून |
| ३७१ | सफर १८ | श. १६७३ पौष व. ६ | इ. १७५१ डिसेंबर २६ |
| ३७४ | रखर १३ | श. १६८० मार्ग. शु. १५ | इ. १७५८ डिसेंबर १५ |

## नजरचुकीच्या तारखा

नजरचुकीच्या तारखांपैकीं फक्त दोहोंचीच चर्चा येथें करतों. ले. २५५ च्या गर्भात 'मोहरम १६' असा निर्देश असून शेवटीं 'रा गुरुवार' असा उल्लेख आहे. तेव्हां पत्राचा काल मोहरम १६ नंतरचा गुरुवार हें निश्चित. श्री. पुरंदरे यांनीं श. १६७२ मधील मोहरम १६ ला मार्गशीर्ष वद्य २ डिसेंबर ४ ही तारीख दिली आहे. पण मोडक जंत्रीप्रमाणें मोहरम १६ वद्य ३ = डिसेंबर ५ ला येते आणि मोहरम १६ नंतरच्या गुरुवारीं वद्य ४ = डिसेंबर ६ ही तारीख पडते. याहीपेक्षां गमतीदार उदाहरण ले. २४० चें आहे. यांत 'मोहरम ९' असा काल आहे. पण श्री. पुरंदरे यांस काय वाटलें कोणास ठाऊक ! त्यांनीं नऊच्या ऐवजीं पाच धरले व तारीख मांडली. एक तर असें करणें बरोबर नाहीं. शिवाय पत्रांतील माहितीचा विचार करतां मोहरम पाच ही तारीख असणें शक्य दिसत नाहीं. रामराजास ताराबाईनें ता. ५ मोहरमला पकडलें. ही बातमी नाना पुरंदऱ्यानें नानासाहेबास कळवून नानासाहेबानें उत्तर धाडण्यास मोहरम ९ उजाडण्यास कांहींच हरकत नाहीं. तेव्हां मोहरम ९ ही तारीख पक्की धरूनच काल मांडला पाहिजे. असो. अशा नजरचूक झालेल्या तारखा येणेंप्रमाणें*

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | खिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| १६८ | जखर २ | श. १६७० ज्येष्ठ शु. ४ | इ. १७४८ मे २० |
| | | श. १६७० ज्येष्ठ शु. ३ | इ. १७४८ मे १९ |
| १७५ | रजब ३ | श. १६७० आषाढ शु. ५ | इ. १७४८ जून २० |
| | | श. १६७० आषाढ शु. ४ | इ. १७४८ जून १९ |
| २१० | मोहरम ६ | श. १६६९ पौष शु. १० | इ. १७४७ डिसेंबर २६ |
| | | श. १६६९ पौष शु. ७ | इ. १७४७ डिसेंबर २७ |
| २४० | मोहरम ९ | श. १६७२ मार्ग. शु. ७ | इ. १७५० नोव्हेंबर २४ |
| | | श. १६७२ मार्ग. शु. ११ | इ. १७५० नोव्हेंबर २८ |
| २५५ | मोहरम १६ नंतर गुरु. | श. १६७२ मार्ग. व. २ | इ. १७५० डिसेंबर ४ |
| | | श. १६७२ मार्ग. व. ४ | इ. १७५० डिसेंबर ६ |
| २७२ | सफर १० मंद. | श. १६७२ पौष शु. १३ | इ. १७५० डिसेंबर २६ |
| | | " " | इ. १७५० डिसेंबर २९ |
| ३१३ | रवल २१ | श. १६७२ माघ व. ८ | इ. १७५१ फेब्रुवारी ६ |
| | | " " | इ. १७५१ फेब्रुवारी ७ |
| ३२२ | रवल २८–२९ | श. १६७२ माघ व. ३० | इ. १७५१ फेब्रु. १४ |
| | | श. १६७२ माघ व. ३०, फाल्गुन शु. १ | इ. १७५१ फेब्रु. १४ व १५ |

* या व पुढील तक्त्यांत श्री. पुरंदरे यांनीं दिलेली तारीख वर मांडली असून मी सुचविलेली तारीख खालीं दिली आहे.

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | ख्रिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| ३२६ | रखर १ | श. १६७२ फाल्गून शु. २ | इ. १७५१ फेब्रुवारी १७ |
| | | श. १६७२ फाल्गून शु. ३ | ,, ,, |
| ३४३ | जवल २५ | श. १६७३ चैत्र व. ११ | इ. १७५१ एप्रील १२ |
| | | ,, ,, | इ. १७५१ एप्रील ११ |
| ३४५ | रमजान ३ | श. १६७२ श्रावण शु. ४ | इ. १७५१ जुलै २६ |
| | | श. १६७३ श्रावण शु. ५ | इ १७५१ जुलै १६ |

## अवश्य बदलण्यासारख्या तारखा

या तिसऱ्या गटांतील बदललेल्या तारखांची संख्या पन्नासावर आहे. यांतील दहा तारखांच्या बदलाचें विस्तृत विवेचन करावयाचें म्हटलें तरी दहा पानें सहज लागतील. तेव्हां तसें न करतां येथें त्यांचा समासतः विचार करतों. ले. २३० (पौष शु. ९, तुंगभद्रा उतरून दक्षिण तीरास मुक्काम व दरमजल पटण प्रांतें जाणें), ले. २८१, २८५ (सफर, १८, ९ नानासाहेबाचा गुडमठकलास मुक्काम), ले. २८७-२८९ (सफर २७, मल्हारबाची अस्थिरता, बाबा-बळवंतरावांच्या प्रकृतीची विचारपूस, चार महिन्यांनीं स्वारीवरून परती दादा गुजराथेस रवाना), ले. २९३, ३६७ (सफर २९, नबाब कलबर्ग्यांपर्यंत व पेशवे यादगिरीस), ले. ३१०, ३११ (रवल १५, १४, पेशवे अद्वानीहून पुढें, बळवंतरायाची शरीरप्रकृति), ले. ३३४ (रखर २७, दोन तीन मजली श्रीरंगपट्टण), ले. ३४८, ३४९ (जखर ५, पुरंदरे घराण्यांतील लग्नमुंजी, सावनूर सहा सात गावें), ले. ३५२ (रजब १०, धारवाडास मुक्काम) हीं चौदा पत्रें, त्यांत आलेल्या तारखा, पेशव्यांचे मुक्काम आणि कंसांत निर्दिष्ट केलेल्या विषयांचे पत्रांतून एकमेकांत गुंतलेले व वारंवार आलेले उल्लेख यांचा साकल्यानें व रोजनिशीच्या आधारें विचार केला म्हणजे हीं सर्व पत्रें इ. १७५०।५१ च्या अंतार्यांत न घालतां इ. १७५२।५३ च्या अंतार्यांत घालावयास पाहिजेत हें उघड ठरतें. पण श्री. पुरंदरे यांनीं चुकीनें हीं सर्व पत्रें इ. १७५०।५१ च्या अंतार्यांत घातलीं आहेत. हें केवळ माझ्याच ध्यानांत आलें असें नाहीं; तर यांपैकीं ९ पत्रांच्या तारखांची मी म्हणतो त्याप्रमाणें दुरुस्ती केली पाहिजे असें शिंदेशाही इतिहासाचीं साधनें खंड ३ मध्येंही सुचविलें आहे. पण तेथें त्या पुस्तकाचे संपादक श्री. फाळके यांनीं ले. २८१ व २८५ यांस इ. १७५१ अखेरच्या तारखा सुचविल्या आहेत तें मात्र बरोबर नाहीं. कारण या वेळीं पेशवे-निजाम यांचा घोड-कुकडी नद्यांच्या आसंमतात हर्षामर्ष चालू असल्यानें पेशवे पुण्याकडेच गुंतून पडले होते. गुडमठकलकडे जाणें त्यांस शक्यच नव्हतें. ले. १४८ मध्यें, महादजी अंबाजीचा ता. १८ सवाल रोजीं येदलाबाद

येथें पेशव्यांबरोबर मुक्काम व चिमाजी आप्पाचा कैलासवास हे विषय आहेत. हें इ. १७४० च्या डिसेंबरमध्यें झालें. पण पुरंदरे दप्तरांत पत्रास तारीख दिली आहे इ. १७४१ च्या डिसेंबरांतील. ले. १५६ मधील जाविद्खान खोजा व नवा वजीर सफदरजंग यांचें भांडण सुरू झालें, जुना वजीर कम्रुद्दीनखान इ. १७४८ मार्च ११ स मरून गेल्यावर ५।६ महिन्यांनीं; पण पुरंदरे दप्तरांत याची तारीख दिली आहे इ. १७४५ च्या पूर्वीं अशी. ले. १५७ व २२० मध्यें रजपूत वगैरेंच्या बोलावण्यावरून नासिरजंगाचें उत्तरेंत जाणें व शिंदेहोळकरांनीं अडविल्यावरून औरंगाबादेस परतणें हा विषय आहे. याचा काल इ. १७४९ मे–जून हें निश्चित आहे. पण श्री. पुरंदरे यांनीं या पत्रांस तारखा दिल्या आहेत इ. १७४५ च्या एप्रिलपूर्वीं व इ. १७४८ जुलै अशा. ले. १७४ मध्यें आषाढ शु. ३ इंदुवार असा योग आहे. हा इ. १७४८ मध्यें न जमता इ. १७५० मध्यें जुळतो येवढेंच नव्हे तर पत्रांत उल्लेखिल्याप्रमाणें शाहूच्या मुलींच व्यवस्था शाहू इ. १७४९ च्या शेवटीं मेल्यानंतरच संभवते. तेव्हा हें पत्र इ. १७४८ ऐवजीं इ. १७५० मध्यें घातलें पाहिजे हें उघड आहे. ले. २०६ मध्यें उल्लेखिलेली फत्तेसिंग भोसल्याच्या सरंजामाची वालमेल रामराजा गादीवर आल्यानंतरची आहे. इ. १७४७ मधील नव्हे; पण येथें या पत्रास तारीख दिली आहे इ. १७४७ जून-जुलै अशी. ले. २९८, ३४६ व ३०१ या पत्रांतील कालनिर्देश सफर ७, रवल ३ व रखर १२ असे आहेत. हीं तिन्ही पत्रें श्री. पुरंदरे यांच्या सूचनेप्रमाणें श. १६७२ मध्यें घातलीं तरी त्या वर्षीं या महिन्यांशीं जुळते मराठी महिने पौष, माघ व फाल्गुन असे येतात. श्री. पुरंदरे यांनीं दिल्याप्रमाणें माघ, फाल्गुन व माघ असे येत नाहींत. ले. १७९-१८१, १८३, १८४, १८६-१८८ यांच्या कालनिश्चयाचें मुख्य गमक बालाजी बाजीरावाचें इ. १७४८ मध्यें उत्तरेस प्रयाण व परती. अब्दालीच्या पहिल्या स्वारींत इ. १७४८ मार्च ११ ला झालेल्या लढाईची बातमी त्यास राजपुतान्यांत एप्रिलच्या आरंभीं कळली. तेव्हां तो इ. १७४८ च्या फेब्रुवारींत पुण्याहून निघाला असला पाहिजे. तो इ. १७४८ जुलै ९ ला पुण्यास परतला हेंही पक्कें ठाऊक आहे. वरील पत्रांत तो पुण्यास आल्यानंतरच्या हकीकती असल्यानें त्यांचा काल इ. १७४८ जुलै ९ नंतर असला पाहिजे हें उघड ठरतें. ले. २२३ मध्यें हिदायत मुहीउद्दीनखान राचोटीच्या लढाईत मारला गेल्याचें वृत्त आहे. त्याच्या मरणाची तारीख इ. १७५१ फेब्रुवारी ३ ही निश्चित असल्यानें या पत्राची तारीख तदनंतरची हें ओघानेंच येते. श्री. पुरंदरे यांनीं दिलेलें इ. १७५० हें साल अर्थात् चुकीचें ठरतें. असो. अशा अवश्य बदलण्यासारख्या तारखा येणेंप्रमाणें—

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | ख्रिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| १४८ | सवाल १८ | श. १६६३ मार्ग. व. ५ | इ. १७४१ डिसें. १६ |
| | | श. १६६२ पौष व. ५ | इ. १७४० डिसें. २७ |

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | ख्रिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| १५६ — | — | श. १६६७ वैशाखपूर्वी | इ. १७४५ च्या पूर्वी |
| | | श. १६७० वैशाखानंतर | इ. १७४८ एप्रील–मे नंतर |
| १५७ — | — | श. १६६७ वैशाखपूर्वी | इ. १७४५ एप्रीलपूर्वी |
| | | श. १६७१ ज्येष्ठ | इ. १७४९ मे |
| १६३ | खल ६ | श. १६७० चैत्र शु. ८ | इ. १७४८ मार्च २५ |
| | | श. १६६९ फाल्गून शु. ७ | इ. १७४८ फेब्रु. २८ |
| १७४ | आषाढ शु. ३ इंदु. | श. १६७० आषाढ शु. ३ | इ. १७४८ जून १७ |
| | | श. १६७२ आषाढ शु. ३ | इ. १७५० जून २५ |
| १७९–१८१ | — | श. १६७० आषाढ | इ. १७४८ जून |
| | | श. १६७० आषाढ वद्य १० नंतर | इ. १७४८ जुलै ९ नंतर |
| १८३–१८४ | — | श. १६७० आषाढ | इ. १७४८ जून-जुलै |
| | | श. १६७० आषाढ वद्य १० नंतर | इ. १७४८ जुलै ९ नंतर |
| १८६–१८८ | — | श. १६७० आषाढ | इ. १७४८ जून-जुलै |
| | | श. १६७० आषाढ वद्य १० नंतर | इ. १७४८ जुलै ९ नंतर |
| १९१ | — | श. १६६९ आषाढ | इ. १७४७ जून-जुलै |
| | | श. १६६९ आषाढ वद्य १० नंतर | इ. १७४८ जुलै ९ नंतर |
| १९२ | — | श. १६६९ आषाढ | इ. १७४७ जून-जुलै |
| | | श. १६६९ आषाढ | इ. १७४७ जुलै |
| १९६ | — | श. १६७० श्रावण | इ. १७४८ आगस्ट |
| | | श. १६७० श्रावण व. ४-६ नंतर | इ. १७४८ आगस्ट १-३ नंतर |
| १९८ | — | श. १६७० श्रावण | इ. १७४८ आगस्ट |
| | | श. १६७० श्रावण व. १३ पूर्वी | इ. १७४८ आगस्ट १० पूर्वी |
| १९९ | — | श. १६७० श्रावण | इ. १७४८ आगस्ट |
| | | श. १६७० भाद्रपद शु. १३ पूर्वी | इ. १७४८ आगस्ट २५ पूर्वी |
| २०० | — | श. १६७० श्रावण | इ. १७४८ आगस्ट |
| | | श. १६७० भाद्रपद शु. १३ पूर्वी | इ. १७४८ आगस्ट २५ पूर्वी |
| २०१ | — | श. १६७० | इ. १७४८ |
| | | श. १६७० आश्विनानंतर | इ. १७४८ पावसाळ्यानंतर |
| २०६ | — | श. १६६९ आषाढ | इ. १७४७ जून–जुलै |
| | | श. १६७२ आषाढ | इ. १७५० जून–जुलै |
| २१२ | — | श. १६६९ माघ | इ. १७४८ जानेवारी |
| | | श. १६७० पौष | इ. १७४८ डिसेंबर |

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | ख्रिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| २१७ | — | श. १६६९ माघ | इ. १७४८ जानेवारी. |
| | | श. १६७० वैशाखानंतर | इ. १७४८ मे मध्यानंतर |
| २१८ | सु. ११४९ — | श. १६७० | इ. १७४८ |
| | | श. १६७० आषाढानंतर | इ. १७४८ जुलै १५ नंतर |
| २१९ | — | श. १६७० वैशाख–ज्येष्ठ | इ. १७४८ एप्रील–मे |
| | | श. १६७० वैशाख–ज्येष्ठ | इ. १७४८ मे |
| २२० | — | श. १६७० आषाढ | इ. १७४८ जुलै. |
| | | श. १६७१ आषाढमध्य | इ. १७४९ जूनमध्य. |
| २२३ | — | श. १६७१ माघ व. ४ | इ. १७५० फेब्रु. १४ |
| | | श. १६७२ माघ व. ४ नंतर | इ. १७५१ फेब्रु. ३ नंतर. |
| २२४ | — | श. १६७४ पौष. | इ. १७५३ जानेवारी |
| | | श. १६७४ मार्ग. अखेर | इ. १७५३ जाने. आरंभ. |
| २३० | पौष शु. ९ — | श. १६७२ पौष शु. ९ | इ. १७५० डिसें. २६ |
| | | श. १६७४ पौष शु. ९ | इ. १७५३ जाने. १३ |
| २४७ | दशमी=शुक्रवार | श. १६७० श्रावण | इ. १७४८ आगस्ट. |
| | | (३१-१-४८ ते २५-३-४८ मध्यें) | |
| २६१ | — | श. १६७२ पौष शु. ७ | इ. १७५० डिसें. २४. |
| | | श. १६७२ मार्ग. शु. ७ पूर्वी | इ. १७५० नोव्हें. २४ पूर्वी |
| २८१ | सफर १८ | श. १६७२ पौष व. ५ | इ. १७५१ जाने. ५ |
| | | श. १६७४ मार्ग. व. ५ | इ. १७५२ डिसें. २५ |
| २८५ | सफर ९ | श. १६७२ पौष व. ११ | इ. १७५१ जाने. १२ |
| | | श. १६७४ मार्ग. शु. १० | इ. १७५२ डिसें. १६. |
| २८७ | सफर २७ | श. १६७२ पौष. व. १४ | इ. १७५१ जाने. १५ |
| | | श. १६७४ मार्ग. व. १४ | इ. १७५३ जाने. ३ |
| २८८ | सफर २७ | श. १६७२ पौष. व. १४ | इ. १७५१ जाने. १५ |
| | | श. १६७४ मार्ग. व. १४ | इ. १७५३ जाने. ३ |
| २८९ | सफर २७ | श. १६७२ पौष. व. १४ | इ. १७४१ जाने. १५ |
| | | श. १६७४ मार्ग. व. १४ | इ. १७५३ जाने. ३ |
| २९३ | सफर २९ | श. १६७२ माघ शु. १ | इ. १७४१ जाने. १७. |
| | | श. १६७४ पौष शु. १ | इ. १७५३ जाने. ५ |
| २९८ | सफर ७ | श. १६७२ माघ शु. ९ | इ. १७४१ जाने. २४ |
| | | श. १६७२ पौष शु. ९ | इ. १७५० डिसें. २६ |

| पत्रक्रम | पत्रांतील तारीख | हिंदू रूपांतर | ख्रिस्ती रूपांतर |
|---|---|---|---|
| ३०० | —— | श. १६७२ माघ शु. | इ. १७५१ जानेवारी |
| | | ,, ,, | इ. १७५१ जाने. मध्य |
| ३०१ | रखर १२ | श. १६७२ माघ शु. १४ | इ. १७५१ जाने. २९. |
| | | श. १६७२ फाल्गुन श. १५ | इ. १७५१ फेब्रु. २८. |
| ३१० | रवल १५ | श. १६७२ माघ व. २ | इ. १७५१ फेब्रु. १. |
| | | श. १६७४ पौष व. २ | इ. १७५३ जाने. २१. |
| ३११ | रवल १४ | श. १६७२ माघ व. १ | इ. १७५१ जाने. ३१ |
| | | श. १६७४ पौष व. १ | इ. १७५३ जाने. २० |
| ३३४ | रखर २७ | श. १६७२ फाल्गून व. १४ | इ. १७५१ मार्च १५. |
| | | श. १६७४ माघ व. १४ | इ. १७५३ मार्च ३ |
| ३४६ | रवल ३ | श. १६७२ फाल्गून शु. ५ | इ. १७५१ फेब्रु. १९. |
| | | श. १६७२ माघ शु. ४. | इ. १७५१ जाने. २० |
| ३४८ | जखर ५ | श. १६७३ वैशाख शु. ७ | इ. १७५१ एप्रील २१ |
| | | श. १६७५ चैत्र शु. ७ | इ. १७५३ एप्रील १० |
| ३४९ | जखर ५ | श. १६७३ वैशाख शु. ७. | इ. १७५१ एप्रील २१ |
| | | श. १६७५ चैत्र शु. ७. | इ. १७५३ एप्रील १० |
| ३५२ | रजब १० | श. १६७३ ज्येष्ठ शु. १२ | इ. १७५१ मे २५ |
| | | श. १६७५ वैशाख शु. १२ | इ. १७५३ मे १४ |
| ३५५ | दशमी=गुरुवार | श. १६७३ ज्येष्ठ व. १० | इ. १७५१ जून ७ |
| | | श. १६७३ ज्येष्ठ शु. १० | इ. १७५१ मे २३ |
| ३५६ | — | श. १६७३ ज्येष्ठ अखेर | इ. १७५१ जून |
| | | श. १६७३ ज्येष्ठ व. ११ नंतर | इ. १७५१ जून ८ नंतर |
| ३५८ | — | श. १६७३ आषाढ | इ. १७५१ जून |
| | | श. १६७३ ज्येष्ठ व. ३० | इ. १७५१ जून १२ |
| ३६७ | — | श. १६७२ पौष अखेर | इ. १७५१ जानेवारी |
| | | श. १६७४ पौष अखेर | इ. १७५३ जाने. अखेर |
| ३६९ | — | श. १६७१ | इ. १७४९ |
| | | श. १६८० | इ. १७५८ |
| ३७३ | — | श. १६७२ फाल्गून | इ. १७५१ फेब्रु.–मार्च. |
| | | श. १६६७, ६८, ६९ फाल्गुन | इ. १७४६, ४७, ४८ फेब्रु. मार्च |

———

# १३ नाना फडणिसाचें एक पत्र

( श्री. चिं. ग. कर्वे-पुणें )

[ हें पत्र कृष्णराव काळे यास असावें व तें थोरल्या माधवरावाच्या वेळचें आहे. बज्याबा पुरंदरे व आपा पुरंदरे यांचें भांडण मिटविण्यासंबंधाचें आहे. सर्व पत्र नानाच्या हातचें आहे. ]

ले. ४१
असल

श्री

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री **कृष्णरावजी** स्वामीचे शेवेसी पो **बालाजी जनार्दन** सा। नमस्कार विनंती उपर येथील कुशल ता। छ२३ जमादिलवल पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष मी श्रीमंताचा निरोप घेऊन आलियास सासात दिवस जाहाले निरोप समई ही राजश्री **बज्याबाचे** व **आपाचे** कजियाचा फडशा दोहो तिही दिवसांत विल्हे लागावयाचे अभयवचन घेऊन त्या भरवशियावर इतके दिवस गेले मी येथे आलियावर श्रीमंतास विनंती कोण करतो आपण करतील अशी निशा होती परंतु कार्य अद्याप जाहालें नाहीं यावरून अनुमान दिसते की आपल्या-सही स्मरण नाही त्यास स्नेहाचे जागा पत्राची मार्गप्रतीक्षा नाही असो सारांश श्रीमंतास वारंवार विनंति करून क्षेषनिक्षेप लौकर फडशा होय असें करावें हें जाहाल्यास मोठें संकटांतून निघालों बज्याबाची सर्वप्रकारें गैरसोय फडशा न जाहाल्यास संसाराचेच कठीण चालावयाचें पडलें आहे श्रीमंतास अगाध कांहींच नाहीं परंतु काय गुंता पडतो हें कांहीं कलत नाही मी आपले भरवशावर आहे विस्तार लिहीत नाही बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

[ अज्ञातवासी संग्रहांतील पत्र ]

—या पत्रांतील विषय पेशवेदप्तरांत ( ता. ३९ ले. ५७, ) एका खंडांत आला असून तेथें निर्णय दिल्याचा उल्लेख आहे.

---

# १४ हरिपंत फडके याचें एक पत्र

( श्री. चिं. ग. कर्वे-पुणें. )

राघोबाच्या पाठलागाच्या वेळचें हें दिसतें. या वेळीं मुक्काम चांगदेव ( पू. खान-देश ) तापी–पूर्णा संगमावर होता.

ले. ४२ } श्री {
असल

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री **नारोपंत नाना** स्वामींचे सेवेसी पोष्य **हरि बलाल** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ताा छ २३ रजब जाणून स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष आपण पत्र पाा ते पावलें लिहिले वर्तमान कललें कापड वगैरे जिनस व पागेकडील सामान **गंगाधर खंडेराव** यां समागमे राा केले म्हणोन लिाा ते कलले अद्यापि पावले नाहीत आल्यावर लिहून पाठवू भाले काढ्या लस्करांत नाही पुण्यांत सिलकेस असल्यास दोनसे पर्यंत हजीराहजीर पाठवाव्या इकडील वर्तमान श्रीमंत तापीतीरास चांगदेवासंनीध आलें उतरावयाचा विचार होत आहे **सरदार** बोलत आहेत उतरतील तेव्हां खरे राजकारणे करावयास चुकत नाही श्रीसतेकडून प्रांत लागेल तो खरा इकडे आमचे राहाणें आपले कुमकेदर आहे सार्वकाल आमची कालजी असावी म्हणजे पार पडूं बहुत काय लिहिणें रूपा करावी हे विनंती

[ तुलशीबाग दप्तर

( सर्व पत्र हरिपंताचें आहे )

---

# १५ सातारा डौलाकडे चिमणगांव

## ( श्री. गो. रा. राजोपाध्ये–सातारा )

ले. ४३ } श्री { श. १७२३ वैशाख शु. ११
असल } { इ. १८०१ एप्रिल २४ शुक्र.

( दुसऱ्या बाजीरावाची पांच ओळीची मुद्रा, आकार कोयरी )

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तां मोकदमानी मौजे चिमणगांव समत कोरेगाव प्रांत वाई सुाा इहिदे मयातैन व आलफ मौजे मजकूरचे सनदे इनामदार वगैरे यांचा यैवज डौल सातारा येथील खर्चास द्यावयाचा सबब मुलकचे झाडे आकार सुधां घेऊन हुजूर सातारियास येणें या कामास गाडदी निाा आपाजीराम पाा आहेत यास मसाला रुाा ५ पांच आदा करणे जाणीजे छ १० जिल्हेज पाा+ हुजूर लेखन

सिमा बार+

---

+ हस्ताक्षर वेगवेगळें.

# १६ हैबतराव निंबाळकर व बाळाजी विश्वनाथ

(श्री. कृ. वा. पुरंदरे– सासवड)

ले. ४४ | श. १६३४ भाद्र. शु. १
इ. १७१२ आग. २२

श्री चिंतामणी श्री पांडुरंग व नशीची

नकल

खरेदीखत शके १६३४ नंदननाम सवत्सरे भाद्रपद शुध १ पाडवा गुरुवार ते दिवसी खरीदखत लिखते राजश्री **बोलो रगनाथ** व **खडो रगनाथ बोग** (ओक) कुलकर्णी वस्ती मौजे वाडे ता। साडस पा। पुणे यासि शंकराजी विठल माहाले जोसी व कुलकर्णी मौजे केसनंद ता। मा। सुहुर सन सलास अशर मया आलफ सन हजार ११२२ कारणे तुम्हास खरीदीखत लिहोन दिधले येसे जे कार्तीक माशी है [ ब ]-**त राव निंबाळकर** व **बाळाजी विश्वनाथ** साल गु। खर संवत्सरी याचे लस्कर येऊन तळेगावास वेढा घातला दीड महिना लस्कर तळेगावी बसले ते समई मुलूख लुटला त्यास आपण थेवरी होतो तेथे लस्करची कही येऊन थेऊर लुटलें सत्यानास केला त्याजबराबर आपणही लुटिले गेलो आपला दागादुणा व आथरुण पांघुरणें व हाडेभाडे गेले काही आर्थ राहिला नाही त्याजवर गाव वोस होऊन गेला आपण देशभरी जालो त्यास सिमागीयाचे महिन्यात थेऊरी वसवत जाहाली त्यावर आपण ज्येष्ठ वद्य ४ थेवरास आलो त्यास पुढे साल मा। दोन महिने पाऊस गेला त्या करिता दुकाल पडिला धारण थोर जाहाली रुपयेची पायेली दीढ पायेली जाहाली आपण उपवासी मरो लागलो खावयास नाही व भीक्षाही कोठे मिळेना आणाईन हईराण जालो येसे विचारीले की आता आपण आनार्वान चुकर जाहाले व मेला तरी वतन आपणास काये होये व येक पुत्र आपले पोटीचा (आ) हे तो मेलियाने वंशवेल बुडेल येसे विचारून आपण येऊन गळा पडलो की मौजे मजकूरचे कुलकरण ज्योतीष चा। ता।

| | |
|---|---|
| ×××× व नारो | गोविंद हरी व आपण |
| माहा (देव) निमे तक्षिमदार त्यानी | × × × × |
| पूर्वीची तुम्हास आपली आगदी तक्षीम | आपली तक्षीम जोतीष |
| दिल्ही त्याचे खरीदखत | कुलकर्ण तुम्हास दिल्हे |
| आलाहिदे तुम्हापासी आहे | त्याचे खरीदखत तुम्हासी |
| उरली आपली चौथी तक्षीम | आलाहिदे गोविदाने दिल्हे |
| ज्योतीस व कुलकर्ण आगदी | असे |
| तुम्हास दिल्हे असे | |

सद्रहू आपली तक्षीम मौजे मजकुरीची जोतीस व कुलकर्णी सर्व तुम्हास आपण खुश रजावंदीनें पैका घेऊन खरेदी दिल्हे किमत रुपये ३०१ तीनसे येक रुपये पचमेल रुपये घेऊन तुम्हास दिल्हे असे तरी तुम्ही लेकरीच्यालेकरी जोतीस व कुलकर्ण आणखी तक्षीम सुखरुप खाणे ( तुम्हास ) कोण्ही आपला भाऊबंद तुम्हासी मुजाहिम होईल त्यास आपण वारून आगर आपण तुम्हांपासी दगाबाजी करू तरी आपणास श्री व आपल्या पूर्वजाची आण असे हे खरीदखत लेहून दिल्हे सही

तारीख छ २८ रजब माहे रजब

गोही

नारो त्रीबक तटु पुणेकर बीरादर
सदोजी नरसींह आजहती देश ,
मुख व देशपांडे कर्याती पाटस

नारो माहादेव जोतीस
कुलकर्णी मौजे थेऊर

सुभानजी पाटील मोकदम
व विसाजी पा मौजे थेऊर
( नांगराचें चित्र )

---

हें खरेदीखत चिंचवड दप्तरांतील असून तें नकल जरी आहे तरी ते गणिताच्या कसोटीस परिपूर्ण उतरतें.

---

भा. इ. सं. मं. स्वीय ग्रंथमाला क्र. ६७

# महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख

( पृष्ठसंख्या १३१ किं. रुपये ३ )

लेखकः— डॉ. मो. गं. दीक्षित

इ. स. च्या पांचव्या शतकापासून ते बाराव्या शतकापर्यंतच्या कालांतील हे लेख आहेत. लेखांतील स्थलनामें व राजघराणीं यांचें विवेचन केलें असून लेखांचीं थोडी प्रतिमा-पत्रें दिलीं आहेत. यांत शिलालेख ६ व ताम्रपत्रें ४ आहेत. राष्ट्रकूट, शिलाहार व कदंब ह्या घराण्यांचे सर्वांत जुने ताम्रपट ह्या ग्रंथांत आले आहेत. शेवटीं सर्व लेखांचा इंग्रजींत सारांश दिला आहे.

---

# मंडळाकडे मिळणारीं कांहीं पुस्तकें—

**आर्य वीरांगना**-( पृष्ठसंख्या २२७, लेखक श्री. के. ब. डोंगरे-ग्वालेर )

ह्या ग्रंथांत इ. स. १६०० ते १८५८ ह्या इतिहास कालांतील राजकारणी, शूर, राज्यकारभारकर्त्या अशा २७ थोर स्त्रियांचीं चरित्रें, सर्व ऐ. साधनांच्या आधारें सुबोध व रसाळ भाषेंत वर्णिलेलीं आहेत. हीं चरित्रें, महाराष्ट्राप्रमाणें, बृहन्महाराष्ट्र, राजस्थान, माळवा इत्यादि देशविभागांतील स्त्रियांचींहि असल्यामुळें ह्या ग्रंथात भारतीय स्वरूप प्राप्त झालें आहे. किं. रु. ३.

**चालुक्य चंद्रिका**- ( हिंदी, पृष्ठसंख्या २६३. लेखकः— विद्यानन्दस्वामी श्रीवास्तव )

विक्रमसंवत्सर ७००-१४४९ म्ह. इ. स. ९१०-१६५९ ह्या ७५० वर्षांचा इतिहास ह्या ग्रंथांत विवेचिला आहे. प्रस्तावनेंत ( पृ. ८७ ) प्राचीन कालापासून तों आंग्लाईपर्यंतच्या लाट म्ह. गुजरातच्या इतिहासाचें समालोचन केलें असून प्रसंगानें मराठे, पेशवे, गायकवाड ह्यांच्या राजवटींचाहि त्या प्रांतांतील वृत्तान्त दिला आहे. आणि इतर सत्ता जी मोंगल तिचेंहि वृत्त सांगितलें आहे. चालुक्यसंबंधीचीं ताम्रपत्रें, शिलाशासनें ह्यांचीं छायाचित्रें देऊन मूळ ग्रंथ हिंदींत पण देवनागर लिपींत हा सर्व ग्रंथ मुद्रित केला आहे. किं. रु. ७

**— दोही ग्रंथांस ट. ह. वेगळें. —**

# ऐ. संकीर्ण साहित्य खंड ७

## सूची

## भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीय-ग्रंथमाला

* हा ग्रंथ मुंबई सरकाराच्या प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयासाठीं मंजूर. ‡ हा शैक्षणिक ( training ) संस्था व शिक्षकग्रंथालयें यांसाठीं मंजूर.

१ अहवाल ( शके १८३२ ) ३
२ „ ( शके १८३३ ) ५
३ सुबंत विचार( कै. वि. का. राजवाडे ) १०
४ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३४ ) ५
५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ ( कै. वि. का. राजवाडे ) १।८
*६ प्रथम संमेलन वृत्त ( शके १८३५ ) ।१२
*७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३५ ) ६
*८ द्वितीय संमेलन वृत्त ( शके १८३६ ) ३
*९ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३६ ) ३
*१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं ) ३
*११ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३७ ) ६
*१२ तृतीय संमेलन-वृत्त ( शके १८३७ ) ३
*१३ मुकुंद-महाभाष्य ( संस्कृत ) ।८
*१४ ग्रंथराज ( दासोपंत ) ।८
*१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला ।१२
*१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा ।१२
***मंडळ-त्रैमासिक** प्रत्येक पुस्तक ३
*१७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३८ ) ३
१८ चतुर्थ-संमेलन-वृत्त ( शके १८३८ ) ३
*१९ राजवाडे-खंड-स्थलसूची ४
*२० पंचम संमेलन-वृत्त ( शके १८३९ ) ३
२२ चंद्रचूड-दप्तर-कला १ ३
२३ महाराष्ट्र-सारस्वत ( संपलें ) १०
२४ षष्ठ संमेलन-वृत्त ( १८४० ) ४
२५ सप्तम संमेलन-वृत्त ( १८४१ ) ३
२६ संशोधकाची छोटी जंत्री ।४
२७ प्रदर्शन परिचय ।४
*२८ फारसी पत्रव्यवहार ५
२९ फार्सी-मराठी कोश ४
३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला १।८
३१ Historical Miscellany १
३२ पुरंदरे-दप्तर भाग १ ४
३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा ४
३४ द. मध्ययु. इ. साधनें खं. १ २
३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं. १, २
३६ राजाराम-चरितम् १।८
३७ मंडळांतील नाणीं १
†३८ शिवचरित्रसाहित्य खंड ४ १।८
३९ गोवळकोंड्याची कुत्बशाही रु. ४
†४० ऐतिहासिक फारसी साहित्य रु. १।८
†४१ दक्षिणच्या मध्ययुगीन इ. सा. खं. २
†४२ ऐतिहासिक संकीर्ण सा. खंड २ १।८
४३ मंडळ चित्र ग्रंथ चित्रें २० ।८
४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह खं. ३ २॥
‡४५ विजयनगर स्मारकग्रंथ ४
†४६ ऐतिहासिक फारसी सा. खंड २ १।८
४७ शिवचरित्रसाहित्य खं. ६ १।८
†४८ मराठी सत्तेचा उत्तरविस्तार ।१२
४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह कानडा १
५० शिवचरित्रसाहित्य खंड ७ १।८
†५१ ऐतिहासिक फार्सी साहित्य ३ १।८
५२ } शिवचरित्रवृत्तसंग्रह २ व ३
†५३ } खंड : फार्सी विभाग प्रत्येकीं १।४
५४ पुणें नगर संशोधन-वृत्त खंड १ रु १
५४अ ऐ. सं. सा. खं. ३ ३
५५ शिवचरित्रसाहित्य खंड ८ १।८
५५अ शि. च. सा. खं. ५ ३॥
५६ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ४ २
५७ ऐ. संकीर्ण वाङ्मय साहि. खं. १ किं. १।८
५८ शिवकालीन दंडनीति-किं. ३
५९ पुणें नगरसंशोधन वृत्त खं. २ किं. १।८
६० ऐ. संकीर्ण निबंध खंड १ किं. १।८
६१ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ५ १।८
६२ शिवचरित्र साहित्य खंड ९ १।८
६३ हिंगणे दप्तर १ ला खंड ३
६४ ऐ. सं. सा. खं. ६ १।८
६५ ऐ. सं. निबंध ३ १।८
६६ पुणें नगरसंशोधनवृत्त खं. ३ किं. १।८
६७ महाराष्ट्रांतील कांहीं ताम्र व शिलालेख डॉ. दीक्षित किं. ३

टीप-ट. ह. व बंगी, व्ही. पी. वगैरे सर्च निराळा पडेल. † हा ग्रंथ त्रैमासिकांत भागशः प्रसिद्ध झाला आहे. ४०-४२, ४६, ४८, ५१, ५३ स्वतंत्रहि मिळतात.

## शिवचरित्र साहित्य खंड

| | | | | | | कि. रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वी. ग्रं मा. क्र. | ३० | पुरंदरे व द. वि. आपटे | पृ. १५४ | (श. १८४८) | १॥ |
| २ | ,, ,, | ३३ | मंडळचिटणीस | पृ. ४२६ | (श. १८५१) | ४ |
| ३ | पुरस्कृत ग्रं. मा. क्र. | २४ | शं. ना. जोशी व ग. ह. खरे | पृ. २७८ | (श. १८५२) | ३ |
| ४ | स्वीय ग्रं. मा. क्र. | ३८ | मंडळचिटणीस | पृ. १२६ | (श. १८५६) | १॥ |
| ५ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. ३६३ | (श. १८६४) | ३॥ |
| ६ | ,, ,, | ४७ | ग. ह. खरे | पृ. १५० | (श. १८५९) | १॥ |
| ७ | ,, ,, | ५० | रु.वा.पुरंदरे व व.द.आपटे | पृ. १६४ | (श. १८६०) | १॥ |
| ८ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. १३२ | (श. १८६४) | १। |
| ९ | ,, ,, | ६२ | शां. वि. अवळसकर | पृ. ११८ | (श. १८६६) | १। |

---

## ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड

| | | | | | | कि. रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वीय ग्रं. क्र. | ३५ | मंडळ चिटणीस | पृ. २०२ | (श. १८५३) | २ |
| २ | ,, | क्र. ४२ | मंडळ चिटणीस | पृ. १०० | (श. १८५६) | १॥ |
| ३ | ,, | क्र. ५४ | शं. ना. जोशी | पृ. ३३२ | (श. १८६३) | ३ |
| ४ | ,, | क्र. ५६ | मंडळ चिटणीस | पृ. १८६ | (श. १८६४) | १॥ |
| ५ | ,, | क्र. ६१ | मंडळ चिटणीस | पृ. ९५ | (श. १८६५) | १॥ |
| ६ | ,, | क्र. ६४ | शं. ना. जोशी | पृ. १०६ | (श. १८६७) | २ |

---

**ऐतिहासिक संकीर्ण निबंध** खंड १ (श. १८६५) पृ. ११२ कि. रु. १॥
,, ,, खंड ३ (श. १८६८) पृ. ७७ कि. रु. १॥

---

**पुणें नगर संशोधन वृत्त** खंड १ (श. १८६४) पृ. ८६ कि. रु. १
,, ,, खंड २ (श. १८६५) पृ. ७५–१७६ कि. रु. १॥
,, ,, खंड ३ (श. १८६८) पृ. १८७–२६९ कि. रु. २
[ तीनहि खंड एकदम ४ रु. ]

---

**दंडनीति**–वा. सि. बेंद्रे, प्र. ७६ ग्रंथ पृ. ६४ कि. रु. ३
ट. हं. वेगळें

---

## ॲबट ( महाराष्ट्र संतकवि ) ग्रंथमाला

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ भानुदास | डॉ. ॲबटकृत | रु. १ | ७ तुकाराम | ,, | रु. १॥ |
| २ एकनाथ | ,, | रु. १॥ | ८ रामदास | ,, | रु. २ |
| ३ भिक्षुगीत | ,, | रु. १॥ | ९ भक्तविजय भाग १ ला | | रु. ३ |
| ४ दासोपंत | ,, | रु. १॥ | १० भक्तविजय भाग २ रा | | रु. ३ |
| ५ बहिणाबाई | ,, | रु. १ | ११ भक्तिलीलामृत | ,, | रु. ३ |
| ६ स्तोत्रमाला | ,, | रु. १ | १२ ज्ञानेश्वर | ,, | रु. ३ |

कापडी बांधणीस ८ आणे जादा.